माझ्या स्वतंत्र कथांचा हा दुसरा संग्रह. 'काचेचें कवच' ह्या पहिल्या संग्रहानंतरच्या आणि पूर्वीच्याही माझ्या कथांपैकीं कांहींचा ह्या संग्रहांत समावेश झाला आहे. त्यांच्या प्रथम प्रकाशनाचा काळ व स्थळ अनुक्रमणिकेंत निर्दिष्ट आहेत. ज्यांनीं ह्या कथा त्या वेळीं प्रकाशित केल्या त्या संपादकांचा मी ऋणी आहें.

'शबनम्' ही गोष्ट आधीं 'दंवबिंदु' ह्या नांवानें प्रसिद्ध झाली होती आणि 'शिष्या' ही 'चुकीचें माप' ह्या नांवानें.

रा. भि. जोशी

मुंबई २८, ५ मे, १९५३

# झम्मन

रात्रपाळीचें सगळें काम आटपलें होतें; वॉर्ड झाडून झाला होता; ऑपरेशनच्या पेशंट्स्‌ना एनिमा देऊन झाला होता; त्यांची लघवी निरनिराळ्या ग्लासांतून ठेवली होती; म्हणून काम संपल्याच्या सुटकेचा निःश्वास टाकून, १५ नंबरच्या 'कॉट'नें दिलेल्या "पिवळ्या हत्ती"चे झुरके ओढीत, संडासाजवळच्या खोलींत झम्मन बसला होता.

झम्मन होता भंगीच, पण त्याला थोडें लिहितां वाचतां येत होतें आणि त्याची बुद्धिही चांगली होती. त्यामुळें रायबरेली जिल्ह्यांतलें आपलें छोटेंसें गांव सोडून जेव्हां तो नोकरीसाठीं मुंबईला आला, तेव्हां त्याला एका मोठ्या इस्पितळांत सहज नोकरी मिळाली आणि कामांत चोख असल्यामुळें लवकरच बढतीही मिळाली.

झम्मन हुशार होता, पण तो जरासा आपल्याच विचारानें चालणारा होता; त्यामुळें रामगुलाम, रामरक्खा, बाली, वगैरे

त्याच्याच गांवच्या आणि त्याच्याच बरोबरीच्या इतर भंग्यांना त्याच्याबद्दल एक प्रकारचा दुरावा वाटे. शिवाय इतरांना न मिळालेली बढती त्याला मिळाली होती त्याबद्दल त्यांना असूयाही होती. म्हणूनच त्यांच्या सल्लयाविरुद्ध त्यानें आपल्या बायकोला-लल्लीला-मुंबईला आणलें आणि आतां तो तिच्यासकट आपला फोटोही काढणार होता, तें त्यांना मुळींच पसंत नव्हतें.

त्या फोटोसंबंधींच्याच विचारांत तो त्या वेळीं गर्क होता. म्हणूनच " मेहतर, मेहतर, " अशी सिस्टरनें मारलेली हाक त्याला ऐकूं आली नाहीं.

" रात्रींचा मेहतर कोण होता ? " सिस्टरनें नर्सला विचारलें.

" झम्मन. "

झम्मनचें नांव ऐकल्याबरोबर सिस्टर शार्पच्या कपाळावर आठी चढली आणि तिची मूळचीच कठोर मुद्रा क्रुद्ध दिसूं लागली. झम्मनवर तिचा राग होता. तिच्या पुढें पुढें करून तिला खुष करणाऱ्यांपैकीं तो नव्हता. आपलें काम चोख असल्यावर आपल्याला कोणाची भीति ? अशी त्याची वृत्ति होती. आणि खरोखरच तो आपल्या कामांत हुशार होता. त्यांत कोठेंही खोड काढायला सिस्टर शार्पला सवड मिळत नसे. आणि त्यामुळेंच ती त्याच्यावर रुष्ट असे.

" झम्मन, " ती मोठ्यानें ओरडली, " सुनता नही. बदमाष. "

आतां मात्र त्याला हाक ऐकूं आली. त्यानें झटकन् अर्धी ओढलेली सिगरेट जोड्याच्या तळव्यावर विझवली, उरलेलें थोटुक शेल्फवर कोणाला दिसेनासें ठेवलें, खिडकीच्या कोपऱ्यांत फुटक्या आरशाचा त्रिकोनी तुकडा होता त्यांत पाहून केस चापून चोपून बसवले, त्यावर टोपी किंचित्

तिरकी घातली आणि कपडे नीट करीत तो सिस्टरसमोर येऊन तिला सलाम करून उभा राहिला.

" ऐकूं येत नाहीं तुला ? "

झम्मन गप्प होता.

" सलाम करायला कां नाहीं आलास मी आल्यावर ? "

तरीही तो बोलला नाहीं.

" फ्लॉवरपॉटमध्यें नवीन पाणी घातलंस ? "

" जी साहेब. "

आपली शोधक आणि भेदक दृष्टि सगळीकडे टाकीत, खाडखाड बूट वाजवीत, सिस्टरनें वॉर्डमधून एक फेरी मारली.

" सब ब्रास पॉलिश किया ? "

" जी. फक्त त्या कोपऱ्यांतली एक खिडकी राह्यली आहे. "

" राह्यली ? कां राह्यली ? कशी राह्यली ? रात्रभर काय केलंस ? झोप घेतलीस ? यू स्वाइन. "

" रात्रीं नंबर १० च्या न्यूमोनियाच्या पेशंटनें फार त्रास दिला साहेब. शिवाय एक कंबर तुटलेली ' जल्दी ' ची केस आली होती. त्यामुळें वेळ झाला नाहीं. "

" तें कांहीं मला सांगूं नकोस. तुला वेळ नव्हता तर जमिनीवरच्या एखाद्या पेशंटकडून कां नाहीं करून घेतलंस ? जा, आतां पॉलिश कर. "

" जी साहेब. "

" हें काय हें ? फुलदाणीवर हे डाग कसले ? "

" पाण्याचा असेल साहेब. "

" पाण्याचा ? जा आत्तां पुन्हा सगळ्या फुलदाण्या साफ कर. आणि बंबाला लिंबू लावलंस ? "

" लावलं जी. "

* * *

सिस्टरनें पुन्हा करायला सांगितलेलीं सगळीं कामें उरकून आपल्या खोलीवर यायला रात्रपाळीच्या झम्मनला साडेदहा वाजले. खरें म्हणजे सकाळीं साताला सिस्टर वार्डमध्यें आली कीं रात्रपाळीच्या लोकांनीं तिला रात्रींच्या कामाचा रिपोर्ट द्यायचा आणि जायचें ; पण सिस्टर शार्पचे आणि झम्मनचे ग्रहच असे होते कीं रात्रपाळीचे इतर लोक गेले तरी त्याला खोलीवर यायला नेहमीं असाच उशीर होत असे. खोलीवर येऊन त्यानें हातपाय धुतले. वॉर्डमध्यें चहा घेतला होता तरी लछ्मीला पुन्हा एकदा चहा करायला सांगितलें आणि तो वळकटीला टेकून चटईवर जरासा स्वस्थ पडला. दहापांच मिनिटें झालीं असतील नसतील, तोंच रामगुलाम येऊन दारांत उभा राहिला आणि म्हणाला,

"चल, तुला सिस्टर बोलावते."

"कां ? आणखी काय झालं ?"

"मला काय माहीत ? वॉर्डांत गेल्यावर कळेल."

रामगुलामच्या बोलण्याच्या पद्धतीवरून झम्मनला कळून चुकलें कीं वॉर्डांत कांहीं तरी भानगड झाली असली पाहिजे. त्याला चीडच आली होती, पण जाणें भाग होतें. टोपी चढवून तो पुन्हा वॉर्डांत आला.

वातावरण तंग होतें. सिस्टरच्या टेबलाशीं R. M. O. बसलेले होते आणि नर्सेस, वॉर्ड-बॉईज, वगैरे गंभीर तोंडें करून टेबलाभोवतीं उभीं होतीं.

तो वॉर्डांत शिरल्याबरोबर,

" झम्मन, इधर आव "

अशी त्याच्यावर वीज कडाडली.

झम्मन पुढें होऊन तिच्यासमोर उभा राहिला आणि सलाम करून म्हणाला,

"साहेब."

"तूं रात्रपाळीचं सगळं काम नीट केलंस ?"

"जी साहेब."

"ऑपरेशन पेशंट्सूचा पिशाब ठेवला होतास?"

"जी होय."

"ग्लासांवर नंबराच्या चिठ्या लावल्या होत्यास?"

आतां झम्मनला आठवण झाली कीं आपण नंबरांच्या चिठ्या ज्या त्या ग्लासाखालीं ठेवल्या होत्या आणि शेजारच्या वॉर्डांतून डिंक आणून चिकटवणार होतों, तें तसेंच राहिलें. कधींही न होणारी चूक आज झाली. लल्लीबरोबर काढायच्या फोटोसंबंधींच्या तंद्रींत आणि सिस्टरनें पुन्हा करायला लावलेल्या कामांच्या गडबडींत चिठ्या लावायचें राहून गेलें आणि ग्लासांखालच्या चिठ्या कशामुळें तरी नाहींशा झाल्या असाव्यात. कांहीं असो, कधीं न सापडणारे आपण सापडलों, ह्या जाणीवेनें त्याचें तोंड उतरलें.

ऑपरेशन-पेशंट्सूच्या लघवीच्या ग्लासांना चिठ्या न लावणें हा फार मोठा अपराध होता हें त्याला माहीत होतें. कोठें तरी त्याची चूक पकडावी ही सिस्टरची इच्छा मात्र अशा रीतीनें सफल होत होती, त्यामुळें त्याला वाईटही वाटलें आणि स्वतःचा रागही आला. आपला रागानें लालबुंद झालेला चेहेरा आणि खुनशी नजर त्याच्यावर रोखून ती उभी राहिली होती.

थोड्या वेळानें झम्मन म्हणाला,

"साहेब, चिठ्या लिहून ग्लासांखालीं ठेवल्या होत्या, पण लावायच्या राह्यल्या. तेवढी चूक झाली. त्याची माफी असावी."

"लावायच्या राह्यल्या? खोटं बोलतोस? चिठ्या तयार केल्या नाहींस. खरं सांग."

"खोटं नाहीं साहेब. खरंच लिहिल्या होत्या आणि लावण्यासाठीं ग्लासांखालीं ठेवल्या होत्या. शेजारच्या वॉर्डांतून गोंद आणून चिकटवणार होतों, तेवढं विसरलों हें कबूल करतों."

...११

" पुरावा काय लिहिल्या होत्यास ह्याला ? कुणाकडून लिहून घेतल्यास ? "

" मीं आपल्या हातानें लिहिल्या होत्या साहेब. "

आपल्याला लिहितां वाचतां येतें आणि आपण आपल्या हातानें चिठ्ठ्या तयार करूं शकतों ह्याचा झम्मनला फार अभिमान होता; म्हणून तो चिठ्ठ्या नेहमीं आपल्या हातानें लिही. इतर मेहतरांना त्या नर्सकडून लिहून घ्याव्या लागत. पण आज त्याचें हें लिहितां-वाचतां येणेंच त्याचें वैरी झालें होतें. कारण चिठ्ठ्या लिहून ठेवल्या होत्या ह्याला दुसऱ्याकडून पुरावा मिळवणें त्याला त्यामुळें अशक्य होतें. तो पुढें बोलूं लागला, " कदाचित् वाऱ्यानें उडून खोलींतच कुठेंतरी पडल्या असतील. मी आतां पाहून येतों. "

एवढें बोलून तो मागच्या बाजूच्या खोलींत गेला, पण चिठ्ठ्या कोठेंही नव्हत्या. वाऱ्यानें उडून गेल्या कीं दिवस-पाळीच्या भंग्यानें त्या झाडून टाकल्या कीं कोणीं त्या बुद्ध्या नाहींशा केल्या, त्याला कांहीं कळेना. तो निराश चेहेरा करून परत सिस्टरच्या टेबलाकडे आला.

" काम चुकवून वर खोटं बोलतोस ! शरम नाहीं वाटत ? "

" मी खोटं बोलत नाहीं साहेब. "

" जास्त बोलूं नकोस. तुम्हां लोकांना लाथाच मारल्या पाहिजेत. Swine, इधर आव. "

तो एक पाऊल पुढें आला, तसें त्याला मारण्यासाठीं तिनें हात उगारला; तेव्हां तो शांतपणें पण निग्रहानें म्हणाला,

" साहेब, मारायचं कारण नाहीं आणि Swine वगैरे शिव्याही देऊं नका. तुम्ही रिपोर्ट करा. मी सजा भोगायला तयार आहें. "

सिस्टरच्या दृष्टीनें ही उर्मटपणाची पराकाष्ठा होती. ती रागानें थरथरत होती. पण तिचा मारण्यासाठीं उगारलेला हात खालीं गेला होता.

टेलिफोन घेण्यासाठीं मध्येंच डॉक्टर बाहेर गेले होते ते तेवढ्यांत परत आले आणि म्हणाले,

" जाऊं दे सिस्टर. सर्जन येत नाहीं. आज ऑपरेशन्स व्हायचीं नाहींत.

" तुम्ही मध्यें पडूं नका. I'll teach him a lesson. Dirty dog. "

असें तावातावानें बोलून ती आपल्या टेबलाशीं जाऊन बसली.

* * *

सिस्टरनें रिपोर्ट केल्यावर मोठा डॉक्टर निकाल काय देणार तें उघड होतें. पण त्यानेंही आपली कैफियत लिहून काढली आणि स्वतः कचेरींत नेऊन दिली.

सिस्टरच्या रिपोर्टाचा पहिला परिणाम म्हणजे दुसऱ्या दिवशीं त्याला त्याच्या वॉर्डातून काढून Casualty मध्यें टाकण्यांत आलें आणि नंतर आठ-पंधरा दिवसांनीं तो बडतर्फ झाला.

* * *

आतां पुढें काय हा प्रश्न झम्मनपुढें उभा राहिला. त्याची हॉस्पिटलची नोकरी सुटल्यावर त्याला तिथली खोलीही सोडावी लागली. मोठ्या खटपटीनें त्यानें नायगांव भागांतच एक खोली भाड्यानें घेतली आणि तो दररोज नोकरीच्या शोधांत हिंडूं लागला. दिवसांमागून दिवस गेले आणि महिनेही चालले. एक एक दिवस त्याला ओझ्यासारखा वाटूं लागला. अनेक ठिकाणीं खेटे घालून कोठें कांहीं जमेना, तेव्हां एक दिवस अगदीं हताश होऊन तो लल्लीला म्हणाला,

" लल्ली, आतां आपलं कसं होणार ? अजून नोकरी मिळत नाहीं. कुलाब्यापासून कल्याणपर्यंत चकरा घातल्या. कांहीं कुठें उमेदीला जागा नाहीं. मी जेव्हां लोकांना कामावर

जातांना पाहातों, तेव्हां मला त्यांचा हेवा वाटतो. वाटतं, ह्यांनींच काय मोठं पुण्य केलं आहे? आणि आपल्यावरच्च कां देवाचा कोप? आपणच्च कां उपाशी मरावं? खरोखर मला कधीं कधीं वाटतं, देव दयाळू म्हणतात तें खोटं. उगीच लोक देव देव करतात."

लक्ष्मी मुकाट्यानें ऐकून घेत होती. बोलतांना तो थोडासा थांबल्यावर ती म्हणाली,

"देवाला कशाला दोष द्यावा आपण? तो सगळ्यांच बरं करतो. आपलंही करील. तो आपली परीक्षा पाहात असेल. माझ्याजवळ अजून पंचवीस-तीस रुपये आहेत, त्यावर आणखी कांहीं दिवस काढतां येतील.

झम्मन कांहीं बोलला नाहीं. मात्र त्याला वाटलें कीं आपली लक्ष्मी खरोखर लक्ष्मी आहे. अशा अडचणींतसुद्धा ती किती टापटिपीने आणि हसतमुखानें संसार करते!

*          *          *

सुमारें महिन्याभरानें लक्ष्मीचे शब्द खरे झाले. एक महिन्याचा पगार पागडी देण्याच्या करारावर त्याला एका वाडींतल्या चाळींत भंग्याची नोकरी मिळाली होती. राहायला खोलीही मिळणार होती. त्याला आनंद झाला होता. लक्ष्मीला ही खूषखबर देण्याची त्याला उत्सुकता लागली होती. तो ज्या ट्रॅममधून चालला होता, ती अगदीं हळू चालते आहे असें त्याला वाटत होतें.

अखेर पोयबावडीचें नाकें आलें तेव्हां ट्रॅम उभी राहाण्याच्या आधींच त्यानें अधीरेपणानें उडी टाकली. रस्ता ओलांडून तो पलीकडे जाणार तेवढ्यांत डावीकडून एक मोठी लॉरी वेगांत आली आणि त्याच्याच पुढें असलेली एक बाई लॉरीखालीं सापडणार असें त्याला वाटलें. तेव्हां ताबडतोब झेप घेऊन त्यानें तिला मार्गे ओढलें; पण एव्हांना लॉरी

अगदीं जवळ आली होती. तिचा त्याला जोराचा धक्का लागला आणि तो खालीं पडून गाडी त्याच्या पायावरून गेली.

पोलीस आले, पंचनामा झाला, त्याला इस्पितळांत नेण्यांत आलें आणि योगायोगानें, ज्या वॉर्डांत पूर्वी तो मेहतर होता त्याच वॉर्डांत त्याला ठेवण्यांत आलें.

* * *

गुडघ्याखालीं झम्मनच्या पायाच्या चिंधड्या झाल्या होत्या. केवळ इंच अर्धा इंच कातड्याच्या पट्टीवर तो लोळा-गोळा लोंबत होता. पाय कापणें भाग होतें. डॉक्टरांनीं पाय तपासला आणि ऑपरेशनची तयारी करायला सांगून ते निघून गेले.

एव्हांना रात्र झाली होती. रात्रीं बाहेरून आल्यावर परत क्वार्टर्समध्यें जाण्यापूर्वी वॉर्डांत डोकावण्याची सिस्टर शार्पची पद्धत होती. त्याप्रमाणें ती आली, तेव्हां जमिनीवर एका कोपऱ्यांत गडबड चाललेली तिला दिसली. तिनें विचारलें,

" कैसा मरीज़ है ? "

" अपना झम्मन साब. इधर मेहतर था. Accident हुआ. "

" What ? झम्मन ! Oh, that swine ! "

एवढें बोलून ती जायला निघाली, तेव्हां नर्स तिला म्हणाली, " एका बाईला वांचवण्यासाठीं तो पुढें झाला आणि त्यांत त्याला accident झाला, सिस्टर. "

" You don't say so ! He is damn impertinent, but not a bad man, eh ! Poor chap. "

* * *

नर्सिसनीं झम्मनची सर्व प्रकारें बडदास्त ठेवली होती. डॉक्टरनींही आपल्याकडून त्याच्यासाठीं शर्थ केली. पण दोन

दिवसांत त्याचा पाय दोनदा कापावा लागला. तरीही अखेर गॅंग्रीन होऊन तिसऱ्याच दिवशीं त्याचा अंत झाला.

रीतीप्रमाणें त्याचे सर्व अंत्यविधि झाले.

हॉस्पिटलमध्यें मेहतर, वॉर्डबॉइज वगैरे त्याच्या आठवणी काढीत. त्याची आणि सिस्टर शार्पची नेहमीं कशी झटापट चाले, पण शेवटीं सिस्टरचें त्याच्याविषयीं मत कसें पालटलें तें सांगत. कांहीं दिवस त्याच्या संबंधींच्या गोष्टींनीं हॉस्पिटल-मध्यें छोटीशी खळबळच उडून गेली. पुढें पुढें ह्या आठवणी कमी होत गेल्या आणि लवकरच झम्मन भूतकालांत आणि विस्मृतींत गडप झाला.

लल्लीची तर कोणाला आठवणही नव्हती. तिचें काय झालें, कोणालाच नक्की ठाऊक नव्हतें. कोणी म्हणे, आपण तिला पोयबावडीवर भीक मागतांना पाहिलें, कोणी म्हणे, तिला नोकरी लागली आणि कोणी म्हणे, ती कुठें तरी बेपत्ता झाली.

हॉस्पिटलचें कामकाज आणि जगाची राहाटी पूर्ववत् चालू राहिली.

# गरिबाची अधेली

वऱ्हाडांतला मे महिना. दुपारची वेळ. रखरखीत ऊन्ह पडलेलें होतें. वाऱ्याची फुंकरसुद्धा नव्हती. कोठेंही सावलीचें नांव नव्हतें.

कमरेला फाटक्या धोतराचा मळकट तुकडा, डोक्याला पागोट्याच्या चिंध्या, खांद्यावर एक जाडजूड लाठी, काळ्या तोंडावर घाम वाळून मीठ झालेलें, असा अवचित्या तहसील-कचेरीच्या देवडींत शिरला, हुश्श करून तिथल्या सावलींत क्षणभर उभा राहिला आणि मग हळुहळू आंत गेला.

समोर, व्हरांड्याला लागून असलेल्या दालनांतल्या चार टेबलांपैकीं डावीकडल्या टेबलाशीं अंबादासपंत बसले होते. त्यांच्या चष्म्याच्या एका मोडलेल्या काडीच्या जागीं ऑफीस-फाइलचा तांबडा पिवळा दोरा बांधलेला होता. भिंगाला एक आडवी चीर गेली होती. ती टाळण्यासाठीं डोळ्यांना बराच

वेडावाकडा ताण देऊन ते उकंडखेडच्या अवचित्याचें ‘अतिक्रमणाचें प्रकरण’ वाचीत होते. वाचतांना मध्येंच दप्तरांच्या फळीवरून समोरच्या टेबलाकडे दृष्टि टाकून ते म्हणाले,

“मिस्टर जोगळेकर, इथें साहेब म्हणतो — Auchitya should be ordered to remove the encroachment beyond the line AB (‘अ ब’ सीमेवर झालेलें अतिक्रमण काढून टाकण्यास अवचित्यास हुकूम द्यावा). म्हणजे AB च्या अलीकडे का पलीकडे हो? तुम्ही नुकतेच मॅट्रिक झालां आहां म्हणून विचारतों.”

आपला कासवकवची चौकटीचा चष्मा सावरण्याच्या मिषानें हसूं लपवीत जोगळेकर म्हणाला,

“पलीकडे.”

“अस्सं, आतां ठीक जमतंय् हें.” असे म्हणून त्यांनीं टेबलावरच्या आपल्या बेलफळांतून तपकिरीची एक मोठी चिमूट नाकपुडींत कोंबली, डाव्या हाताच्या तळव्यानें नाक पुसलें आणि चष्मा नीट करून ते पुन्हा कामांत गर्क झाले. पण इतक्यांत त्यांच्या टेबलावर सावली पडली. तिच्या कारणाकडे लक्ष जाऊन तें घाणेरडें आणि दरिद्री आहे असें दिसतांच त्यांच्या अरुंद कपाळावर आंठ्या चढल्या आणि त्यांचें सुरकुतलेलें चिंचोळें नाक आणखीच आवळलें गेलें. खुर्चीच्या मोडक्या पाठीवर रेलून, चष्म्याच्या रुपेरी कडांवरून त्यांनीं त्याच्याकडे दृष्टि टाकली.

“राम राम भाऊसाब. मी अवचित्या म्हार जी. उकंड-खेडचा.”

“अँ? मग? जरा लांब उभा राहा कीं! अगदीं टेबलाशीं कशाला खेटतोस? काय पाहिजे?”

“माहा हुकमाचा कागद आला असन् त द्या भाऊसाब, मल्ये अपील करावू लागत्ये.”

समोर पडलेल्या त्याच्या 'प्रकरणा'कडे पाहून अंबादासपंत म्हणाले,

"कागद काय माझ्या टेबलावर काढून ठेवलाय् तुझ्या काकानें ?"

अवचित्या तसाच उभा होता.

"अरे बाबा, जा. ह्या वेळीं त्रास देऊं नको. असेल तुझा कागद तर येईल तुझ्याकडे."

"त्यायले त लई रोज लागतीन्. आतां देसान् त उपकार होतीन्."

"तुझा काय कुणी इथें नोकर आहे ? जा. पुन्हा ये उद्यां बिद्यां. आम्ही अशीं कामं करीत बसलों ..."

"माहा गांव लई दूर आय भाऊ, यवढं गरिबाचं काम करसान् त लेकरं दुवा देतेल बघा. पाटील जमिनीवर पायबी टाकूं देईना. एवढी दया करा ..."

"गांव लांब आहे तर काय छकडा पाठवूं तुला आणायला ? काम तुझं आहे, का माझं ? तावडतोबीनें कामं उगीच फुकट होत नसतात. आतां हें सरकारी काम बाजूला ठेवून तुझ्यासाठीं सगळ्या मिसला काढायच्या. फुकट मेहनत ... ?"

"मी गरीब आय भाऊसाब. माह्यापाशीं काय बी नाय्."

"पाहा हो सिद्धोपंत, काय लोचट माणूस आहे ! 'कागद' 'कागद' करतो आहे, पण एक छदाम कांहीं काढायचा नाहीं..."

"ए, चल काढ कांहींतरी, नाहीं तर हो चालता. इथें नको उभा राहूं टेबलाशीं. बघ, चपराशाला सांगून हाकून देईन..."

"नुरुल्ला, जरा इधर आव ...."

"हें पाहा जोगळेकर, असं विचित्र तोंड करून पाहूला नको माझ्याकडे. मला ठाऊक आहे, तुम्ही फार सोवळे

आहांत ते. आतांच शाळेंतून बाहेर पडलां आहां म्हणून हें सगळं. तीस रुपये पगारावर दोन मुलांच्या मुंजी आणि चार मुलींचीं लग्नं करायची वेळ आली, म्हणजे पाहूं किती सोवळे राहातां तें ... "

" हं, काय रे बुवा ? चटकन् काढ काय तें. मला नाहीं वेळ हुज्जत घालायला. अरे तुम्हांला काय कमी आहे ? आतां तर महारांचंच राज्य व्हायचंय आमच्यावर. "

अवचित्या क्षणभर स्तब्ध राहिला, नंतर थोडासा चळवळला आणि मग पागोट्याच्या एका चिंधीच्या टोकाला एकच अधेली बांधलेली होती, ती काढून त्यानें कष्टी अंतःकरणानें लांबूनच पंतांच्या टेबलावर टाकली. ती अधेली टाकतांना त्याला फार जड गेलें. पण एवढ्यानें तरी काम होईल ह्या एका आशेवरच त्यानें तसें केलें आणि त्या आशेमुळेंच त्याचा चेहेरा थोडासा खुलला.

पण लहान नाणें पाहातांच पंतांनीं डोळे मोठे केले आणि ते ओरडले,

" का माझ्यावर उपकार करतोस काय ? मी कांहीं भीक नव्हतों मागत तुझ्यापाशीं. अरे हरामखोरांनो, काम तुमचं करायचं आणि आव आमच्यावर उपकार केल्याचा ! अन् तें काय आहे आणखी त्या चिंधींत बांधलेलं ? चल काढ, एक रुपया तरी पाहिजे. "

ह्या अनपेक्षित कडकडाटानें अवचित्या बावरला. त्यानें चिंधी सोडून दाखवीत म्हटलें,

" ही बगा तमाकू. मापाशीं आतां येक बी पैसा नाय् भाऊ. मीठमिरचीले अन् माही पोरगी लई बेमार हाय तिले दवा घेन्यासाठीं आठ आने आनले व्हते, त्ये ठ्यवले तुमच्या पायांपाशीं. आतां यवढी दया करा, भाऊ. माह्या पोरीच्या दव्यासाठीं मले पैसे द्या अन् न्हायलेले तुम्ही ठ्यवा. पोरगी तडफडतीया बघा मायबाप. "

" तर! केवढी दया करतो आहेस माझ्यावर! म्हणे 'पोरगी बेमार आहे.' बायको मेली नाहीं का? लबाड. पैसे नव्हते तर आलास कशाला इथें? चल हो चालता."

आणि एका टिचकीनें त्यांनीं अधेली टेबलावरून उडविली.

ओट्यावर एक टप्पा घेऊन ती नेमकी अंगणांतल्या गटारांत पडली.

अवचित्याच्या चेहेऱ्यावर संताप आणि असहायता हीं एकत्र झालीं होतीं. पंतांकडे एक उद्विग्न कटाक्ष टाकून तो अंगणांत आला. गटारांत हात घालून त्यानें त्या राडांत पुष्कळ चाचपून पाहिलें. कोपरापर्यंत त्याचे हात त्या घाणींत बरबटले पण अधेली हातीं लागली नाहीं. अंगणांतल्या मातींत हात कोरडे करून त्यानें धोतराला पुसले आणि पंतांच्या टेबलापाशीं येऊन कांपऱ्या स्वरांत तो म्हणाला,

"रामराम भाऊसाब. गरिबाची अधेली माही बी नाय आन् तुमची बी नाय अशी केली. आतां माह्या पोरीला ......"

गळा दाटून आल्यामुळें त्याच्यानें अधिक बोलवेना.

क्षणभर थांबून तो मागें वळला आणि तडक कचेरीच्या बाहेर निघून गेला.

पंत तुच्छतेनें हसले. इतर म्हाताऱ्या कारकुनांनीं त्यांना दुजोरा दिला. समोर बसलेल्या तरुण जोगळेकरास मात्र तें सहन झालें नाहीं. तो म्हणाला,

" पंत, बरं नाहीं झालं हें!"

" एवढा कळवळा आला होता, तर दिलेत कां नाहींत खिशांतले आठ आणे काढून?"

" असते तर दिल्याखेरीज राह्यलों नसतों."

पंतांनीं चष्म्यावरून त्याच्याकडे खोंचक नजर टाकली.

* * *

अवचित्या उकंडखेडला पोचला तों दिवे लागून गेले होते. झोपडीपासून पांच सात पावलांवर त्याची आकृति दिसतांच कवळीनें त्याला पहिला प्रश्न विचारला,

"आनली काय मिरीची दवा? पोरगी क्यद्धळची तळमळतीया."

अवचित्या कांहीं बोलला नाहीं. तो मिरीच्या बिछान्यापाशीं येऊन बसला.

तापानें फणफणलेल्या आणि अस्वस्थतेनें हातपाय झाडणाऱ्या आपल्या तीन वर्षांच्या चिमण्या मिरीवर दृष्टि जातांच अवचित्याच्या अंतःकरणाचे बांध फुटले आणि एक जोराचा हृदयद्रावक हुंदका देऊन त्यानें आपलें तोंड गुडघ्यांत खुपसलें.

कवळीनें पुन्हा पुन्हा विचारलें तेव्हां तो अत्यंत उदासवाण्या चेहेऱ्यानें उद्गारला, "आतां मिरीचं आउक्ष अंबाबाईच्या हातीं. दव्याचे पैसे बामनापुढ ठ्यवले, ते त्यायनं गटारांत टाकले. ह्या कलयुगांत गरिबाची दुनया न्हाय्."

फाटक्या गोधडीवर तळमळत पडलेली त्याची लाडकी मिरी कण्हत होती आणि त्याचे भेसूर पडसाद त्याच्या हृदयांत उठत होते.

# विझण्यापूर्वीं

शुभेला क्षयाची भावना झाल्याचें तिच्या वडिलांकडून कळलें, तेव्हां मीं तिला आमच्याकडे बोलावून घेतलें. थारेपालट झाल्यामुळें, आणि आमच्याकडे येण्यानें तिला झालेल्या आनंदामुळें, तिला पुष्कळच बरें वाटलें. ती माझ्याबरोबर शेतावर येई; कित्येक वेळां आम्ही विंध्याचलाच्या दऱ्याखोऱ्यांत सहलीला जात असूं. केव्हां संध्याकाळीं तिनें दिलरुबा वाजवावा आणि मी स्वस्थ बसून दिवसाचा शीण घालवावा, किंवा कधीं लहानपणचीं सुखदुःखें आठवून मन रंजवावें...

पण हें कांहीं दिवसच. हळुहळू ती क्षीण होत चालली. पुढें तिला बंगल्याच्या आवाराबाहेर फारसें जातां येईनासें झालें आणि अलीकडे तर ती बहुतेक अंथरुणांतच पडून असे. त्यामुळें ती अगदीं कंटाळून गेली होती आणि दिवस कसे अगदीं रखडत चालले होते.

* * *

त्या दिवशीं मला फारच उदास वाटत होतें. दुपारभर वळचणीला दोन हुलगे सारखे 'हु हू हु हू' करीत होते. कांहीं सुचेना म्हणून मी खिडकीशीं जाऊन उभा राहिलों. पण सृष्टीही उदासच असावी. सगळीकडे अगदीं निःशब्द होतें. त्यामुळें मधूनच जर गांवांत एखादें कुत्रें भुंकलें किंवा झाडींत कुक्कुड कोंबड्यानें 'कुक् कुक्' केलें तर अगदीं धक्का बसल्यासारखें वाटे.

मी शून्य दृष्टीनें दूरवरच्या चोरलच्या पात्राकडे पाहात उभा होतों, तों शुभेची हाक ऐकलीसें वाटलें म्हणून आंत वळलों. तिच्या जवळ जाऊन हळूच मच्छरदाणींत डोकावलों. ती निजलेलीच दिसत होती. तिचा श्वास अगदीं संथ चालला होता. एक वेळ सतेज असलेला चेहेरा वर्ष सहा महिन्यांच्या आजारानें अगदीं कोमेजून गेला होता. पोवळ्यासारखे लाल ओठ रंग उडालेल्या कागदी फुलासारखे फिकटले होते. गळून गेलेल्या शिरीषाच्या केसराप्रमाणें निर्जीव झालेले निस्तेज केस गालातोंडाला बिलगले होते.

तिच्याकडे पाहातांना माझ्या मनांत ओझरता विचार आला, 'हिच्या ह्या दुर्दशेचं कारण ... ?'

मच्छरदाणी सारखी करून मी बाजूला होणार इतक्यांत तिनें डोळे उघडून विचारलें, "किती वाजले ? मला चांगलीच झोप लागली होती. हाक मारलीस का ?"

"नाहीं. मला वाटलं, तूंच हाक मारलीस, म्हणून मी पाह्यला आलों. साडेतीन वाजलेत. चहा घ्यायचा ना ?" आणि मी आंत चहा सांगायला गेलों.

"आज फार प्रसन्न वाटतंय्, नाहीं ?" चहा घेतांना शुभा म्हणाली. मला तसें मुळींच वाटत नव्हतें, पण तिला बरें वाटावें म्हणून मीं म्हटलें,

"संध्याकाळीं बागेंत बसूं या का ? Wheel-chair वर नेऊं."

" हो, बसूं कीं. मी तुला सांगणारच होतें. "

तिचा असा उल्हास अलीकडे तरी आम्हांला अपरिचितच होता.

संध्याकाळीं आम्ही बागेंत जाऊन बसलों. सूर्य पश्चिमेला अगदीं टेकायला आला. ती म्हणाली,

" तें ' संगमोत्सुक डोहा 'चं रेकॉर्ड लावतोस ? "

मंद वारा फुलांच्या ताटव्यांवरून वाहात होता. त्यांतच त्या गाण्याचे विरहाकुल स्वर मंथरतेनें विलीन होत होते. शुभेची अगदीं तंद्री लागली.

* * *

सगळीकडे निजानीज झाल्यावर मीही निजायला म्हणून शुभेच्या खोलींत आलों आणि झोपण्यापूर्वी कांहीं तरी वाचावें म्हणून हाताशींच Hall Caine चें The Woman Thou Gavest Me लागलें तें घेऊन आरामखुर्चीवर पडलों. पण वाचतां वाचतां त्यांतल्या एका प्रसंगामुळें माझ्याच पूर्वायुष्यांतल्या आठवणी मनांत चळवळूं लागल्या ...

मी अमेरिकेला गेलों, तेव्हां शुभेचें लग्न होऊन ती केव्हां तरी दुसऱ्याची होईल आणि मग इतक्या वर्षांच्या निरंतर सहवासानंतर आमच्यांत कदाचित् परकेपणा उत्पन्न होईल, ही कल्पना देखील मला आली नव्हती. बोट हालण्यापूर्वी निरोप घेतांना, आंसवांतून थरथरणाऱ्या डोळ्यांनीं माझ्याकडे पाहात तिनें जेव्हां मला विचारलें,

"तिकडे गेल्यावर विसरणार नाहींस ना ? आणि परत येशील ना ? कां आपला राहाशील तिकडेच ? " तेव्हां मीं म्हटलें होतें,

" खास येईन. एका माणसासाठीं तरी. "

तेव्हांचें तें तिचें पाहाणें ... !

पण मी तिकडे असतांनाच इकडे तिचें एका बड्या गृहस्थाशीं लग्न ठरलें. आपल्या मनांतल्या माझ्याविषयींच्या भावना बोलून दाखवण्याचा प्रयत्न तिनें केला. ती रुसली, रडली; पण पोरपणाच्या सबबीवर तिचें मत गुंडाळून ठेवून तिला मुंडावळ्या बांधण्यांत आल्या आणि एका वर्षाच्या आंत ती नवऱ्याचें घर सोडून परतही आली. त्या वेळीं तिनें लिहिलेल्या पत्रांतला मजकूर एखाद्या अग्निरेखेप्रमाणें अजून माझ्या डोळ्यांसमोर उभा आहे.

ती आपल्या नवऱ्याच्या घराला एखाद्या सुबक फुलदाणी-पेक्षां अधिक नव्हती. त्याचें मन खरोखर रमे, तें हाफकास्ट युरोपिअन स्त्रीपुरुषांबरोबर. तो तिला आपल्याबरोबर कधींही नेत नसे. कारण काय? तर त्यांचा सहवास तिच्या-सारखीला बरा नाहीं. तो मात्र त्यांच्याबरोबर अर्धीअधिक रात्र घालवी. एकदा त्यानें एक निमगोरी मुलगी घरीं पाहुणी म्हणून राहायला आणली. ती शुभेची सवत ठरली. त्याबद्दल शुभेनें प्रश्न करतांच तिला उत्तर मिळालें, "तुला वाटल्यास रस्ता मोकळा आहे आणि पुन्हा परत येण्याची आवश्यकता नाहीं." त्याच दिवशीं ती परतली.

परत आल्यावर मी तिला भेटायला गेलों. किती फरक पडला होता तिच्यांत! आणि त्यानंतर तिला क्षय लागल्याची बातमी ...

* * *

"काय करतोयस्?" भर कथौघांत बोलपट तुटावा तसें मला झालें.

"शुभा, जागीच आहेस तूं?"

"कसलं पुस्तक आहे?"

"The Woman Thou Gavest Me."

"कसं वाटतं तुला तें?"

"बरं दिसतंय्."

"त्यांत मेरी आपल्या नवऱ्याला सोडून मार्टिनजवळ बायकोसारखी राहाते, त्याबद्दल तुला काय वाटतं?"

"मी अजून तिथपर्यंत आलों नाहीं."

"मला त्यांत कांहीं वावगं वाटलं नाहीं..." मग थोडेंसें थांबून पुन्हा...

"खरोखर आपलीं लग्नं म्हणजे नुसतं ढोंग आहे, नाहीं? आपण त्याला मोठा धार्मिक संस्कार म्हणतों, पण त्यांत साध्या व्यवहारांतला सरळपणा आणि समंजसपणासुद्धा नसतो..."

ती लग्नासंबंधीं सहसा कधीं बोलत नसे. त्या दिवशीं तिची वृत्तिच कांहीं निराळी दिसत होती आणि ती हें बोलली तेंही किती आवेशानें! मी नुसता पाहात राहिलों...

मग तीही पुढें बोलली नाहीं. तिला त्रास होऊं नये म्हणून तिच्या बाजूनें दिव्याला एक कागद लावून मी पुन्हा वाचूं लागलों, पण लक्ष लागेना. थोड्या वेळानें अकरा वाजलेले पाहिले आणि पुस्तक ठेवून देऊन जरा गार वारें घ्यावें म्हणून खिडकीपाशीं गेलों.

* * *

दुपारच्याचसारखी निःशब्दता; पण आतां अंधारामुळें तींत एक प्रकारचा भीषणपणा आला होता. दिवसा तरलपणें लखलखणारें चोरलचें पात्र आतां काळवंडून भोवतालच्या अंधारांत विलीन झालें होतें.

दुरून कुठून तरी भजनी मंडळीचे ओढलेले स्वर कानांवर पडत होते. कुठें तरी कुत्र्याचे हेल, रातकिड्यांचे कर्कश किर्रर्र! एवढ्यांत एक मोठा उल्का सप्कन् खालीं पडला. विजेसारख्या त्याच्या चकचकाटांत आमच्या बागेंतलीं फुलेंसुद्धा स्पष्ट दिसलीं. अगदीं पापणी लवे तों. मग डोळे दिपल्यामुळें आधींचा अंधार अधिक काळा मात्र वाटला...

"भाई."

मी चमकलों. मला वाटलें होतें, शुभा झोपली असावी. मी तिच्याजवळ जाऊन म्हणालों,

"अजून नाहीं का झोप आली तुला? मला वाटलं, तूं निजलीस. काय हवंय्? कांहीं होतंय् का?"

"इथें माझ्या जवळ बैस, मला कसं तरी होतंय् आज. असं वाटतं, आज रात्रीं कांहीं तरी होणार आहे मला. मी..."

मी तिच्याजवळ बसलों आणि तिची समजूत घालीत म्हणालों,

"वेडी. उगीच कांहींतरी बोलूं नको. आतां लवकर बरी होशील अं तूं."

"तुम्ही मला अगदींच दूधखुळी समजतां का रे? तुझ्या बोलण्यानें आतां माझी समजूत पटेल असं वाटतं तुला? तुम्हीं मला सांगितलंत नाहीं, तरी मला काय झालंय् तें मला एव्हांना चांगलं कळलंय्."

एवढ्या बोलण्यानेंच तिला दम लागला. थोडें थांबून, कांपऱ्या स्वरानें, अडखळत, ती पुन्हा म्हणाली,

"भाई, मला बरेच दिवसांपासून तुला कांहीं विचारायचं आहे. विचारूं का?"

"विचार ना. त्याला एवढे आढेवढे कशाला?"

"तूं असा संन्याशासारखा कां राहातोस? लग्न कां नाहीं करीत?" तिनें आवेगानें विचारलें.

अंधारांत कोणींतरी मागून येऊन अकल्पितपणें हात धरावा तसें मला झालें. दुसरा कोणताही प्रश्न तिनें विचारला असता तरी मला त्याचें इतकें आश्चर्य वाटलें नसतें. कातरता, रुष्टता आणि जिज्ञासा ह्यांनीं भारलेल्या त्या प्रश्नाचें उत्तर मला चटकन् देतां येईना. मीं थांबून म्हटलें,

"शुभे, तूं हा प्रश्न कां विचारावास? मला कुणाशीं लग्न करावंसं वाटलं असतं, ह्याची तुला कांहींच कल्पना नाहीं का? आतां तें शक्य कसं आहे?"

" पण एखादी गोष्ट आपल्या मनासारखी झाली नाहीं, म्हणून सगळा जन्म उदासवाणी घालवावा का ? "

" पण मी उदास कुठें आहें ? आणि भलत्या वाटेनें जाऊन सुख मिळेल असं वाटतं तुला ? जाऊं दे हा विषय. "

एक लांब उसासा टाकून ती म्हणाली,

" भाई, तुला अजून माझ्याबद्दल पहिल्याइतकंच वाटतं ? "

" तुला शंका वाटते ना ? "

" नाहीं रे ! "

बराच वेळ आम्ही कांहीं न बोलतां स्वस्थच होतों. मग मी म्हणालों,

" आतां अगदीं स्वस्थ निजायचं अं. मुळींच कशाचा विचार करायचा नाहीं. " आणि मी जायला उठलों.

" हो, अगदीं स्वस्थ. " ती म्हणाली.

तिचा स्वर मला चमत्कारिक वाटला. मीं म्हटलें,

" काय झालं ? "

" कांहीं नाहीं. "

टेबलावरचा दिवा एकाएकीं मोठा झाला...तेल संपत आलें असावें...

त्या उजेडांत तिच्या नाकपुड्या स्फुरतांना दिसत होत्या फिकट तोंडावर तांबूस तकाकी आली होती, किंचित् विलग झालेल्या ओठांच्या पाकळ्या थरथरत होत्या आणि आंतून चमकणाऱ्या दांतांची छटा दिसत होती; टपोरे डोळे अगदीं विलक्षण चमकत होते, वादळांत सापडलेल्या इवल्याशा नावेसारखें ऊर हेलकावत होतें, हृदयाची धडक कानांवर आदळत होती. माझेंही हृदय धडधडूं लागलें. मला क्षणाचाही अवकाश न देतां, ती म्हणाली,

" आज इथेंच नीज ना, आज... मी ... "

मी निमिषमात्र स्तब्ध होतों आणि ...

...२९.

मग तिथेंच निजलों. कोणी कांहीं बोललें नाहीं. काय बोलायचें? पण तिला किती बरें वाटलें! तें तिच्या श्वासाश्वासांतून, नाडीच्या ठोक्याठोक्यांतून कळत होतें.

लग्न झाल्यापासून आज पहिल्यानें ती इतकी उल्हसित आणि उत्तेजित झाली असावी. ती नेहमींच अशी आनंदित राहूं शकती तर... कां लग्न करून दिल तिचें त्या माणसाशीं? ह्या आणि अशाच विचारांची मनांत गर्दी चालू असतांना मला केव्हांतरी झोप लागली असावी.

* * *

सकाळीं जागा झालों, तों चांगलें उजाडलें होतें. मी खिडकीशीं गेलों. अंधाराचें आवरण बाजूला सारून सूर्यबिंब नुकतेंच वर आलें होतें. पिवळें पिवळें ऊन हळूच येऊन झाडांफुलांना जागें करीत होतें. फुलवेली डुलत होत्या. चमचमणारे दंवाचे थेंब पानांफुलांच्या बिछान्यांवरून उठून उन्हांत उड्या घ्यायला अधीर झाले होते. पक्ष्यांच्या किलबिलाटानें झाडेंझुडपें गजबजलीं होतीं...

ही सगळी शोभा शुभेला दाखवावी म्हणून मीं मोठ्यानेंच हाक मारली,

"शुभे..."

"शुभा..."

तिची हालचाल ऐकूं आली नाहीं.

मी मच्छरदाणीशीं जाऊन आंत डोकावलों; ऊन नुकतेंच तिच्या भुरकट केसांत शिरूं लागलें होतें. तिचा चेहेरा हस्तिदंतासारखा फिकट पण प्रसन्न आणि मोहक दिसत होता.

"शुभू, बाहेर बघ कसं छान आहे! ऊठ..."

मीं हळूच तिच्या कपाळाला हात लावला, तो झटका बसल्यासारखा मागें आला. तिचें अंग, लाटांनीं किनाऱ्यावर फेकून दिलेल्या शेवाळासारखें गार होतें. श्वास संपला होता...

मला तें पाहावेना. मी बाहेर आलों.

सृष्टि प्रसन्न होती. बागेंतल्या वेलींवरचीं जाईचीं फुलें फुललीं होतीं.

खिडकींतून आगगाडीच्या रस्त्याचे चकाकणारे दोनच दोन रूळ लांबवर गेलेले दिसत होते. अगदीं अहोरात्र एकमेकांशेजारीं...पण एकत्र?

...क्षितिजावर?

# शबनम्

शेजारच्या मस्तानशाही मशिदींतली संध्याकाळची ‘आझान’ ऐकली कीं तिला अजूनसुद्धा राजपूरला घालवलेल्या दिवसांची आठवण होई. मशिदीच्या सोनेरी कळसांच्या टोकांवर संध्याकाळचे तांबुस किरण पडून ते झळकूं लागले आणि नमाजेची बांग कानांवर आली कीं शेळ्या घराकडे वळवल्याच पाहिजेत अशी तिच्या आईची सक्त ताकीद असे. आपण आणि आफ्ताबनें शेळ्या हाकारायच्या आणि गळ्यांतलीं घुंगरे खुळखुळावीत, ‘खुसक खिसक’ खूर घाशीत, शेळ्या पुढें चालल्या आहेत आणि मागून त्यांच्या खुरांनीं उधळलेल्या सोनेरी धुळींतून आफ्ताब आणि आपण हातांतले बाभळीचे फोक सपकावीत बोलत बोलत चाललों आहों, ही आठवण तिला रोज संध्याकाळची यायची.

तिला आठवत होतें तेव्हांपासून आफ्ताब तिचा खेळगडी होता. आरंभीं तोच तिच्याही घरच्या शेळ्या पहाडावर

चरायला नेई. पुढें जराशी मोठी झाल्यावर तीही त्याच्या बरोबर जाऊं लागली. एकीकडे शेळयांना चरत सोडून द्यावें आणि दुसरीकडे बोरें, चिंचा, जांभळें, सीताफळें अशी जीं मिळतील तीं रानफळें खात खेळत रमावें, दुपारच्या निवान्त वेळीं शेळ्या सावलीला आल्या म्हणजे आपणही आपली चटणीभाकरी काढावी, खाऊन ओढ्याचें स्वच्छ गार पाणी प्यावें आणि मजेंत झाडाखालीं पसरावें किंवा बैठे खेळ खेळावेत. कधीं कधीं लुटुपुटीचीं नवरा-बायको व्हावें.

पण जरा बकऱ्यांनीं हालचाल केली किंवा वाऱ्याच्या झुळकेनें पान सळसळलें—फडफडलें तरी त्यांना धडकी भरे, त्याचीही तिला आठवण होई.

* * *

हिंवाळ्याचे दिवस होते. तीं दोघें शेळ्या घेऊन निघालीं होतीं. रानझुडपांच्या कडांवर आणि हिरवळीच्या टोंकदार पात्यांवर दंवाचे इवलाले नाजूक कण हिरकण्यांसारखे सप्तरंगांनीं चमचमत होते.

"नसीम, बघ कसं चमचम करतं आहे शबनम्. तुझ्या डोळ्यांसारखं." तो म्हणाला.

"शबनम् म्हणजे काय ?"

"हें दंव"

"हं, हं. हें तर ओस."

"तेंच शबनम्."

"हें आतां कसं छान चमचमतंय् आणि दुपारीं कुठें नसतं तें रे ?"

"आतां सकाळच्या कोवळ्या उन्हांत चमकतं तें. मग दिवस असा वरतीं आला, ऊन कडकलं, सूर्य तापला कीं त्याची वाफ होऊन तें जळून जातं."

"असं असं ! म्हणजे आफ़्ताबच त्याला असं सुंदर चमकवतो आणि तोच मागून त्याला जाळतो."

...३३

मग जरा वेळ थांबून ती त्याला म्हणाली, "पण शबनम् नांव किती चांगलं आहे ! तूं आतां मला नसीम नको म्हणूं; शबनम् म्हणत जा."

"वा, वा, नसीम छान नांव आहे."

"नाहीं, पण मला शबनम् म्हटलं पाहिजे."

"बरं म्हणेन."

"पण गुपीत हं. आपलं दोघांतलं नांव. दुसऱ्या कुणाला सांगायचं नाहीं."

"नाहीं. झालं ?"

आणि तेव्हांपासून त्या दोघांमध्यें तिचें नांव शबनमच पडलें.

* * *

मीरांसाहेबाचा – नसीमच्या बापाचा – टांगा होता. तो देहरादून ते राजपूर सवारी करीत असे. त्यावर त्यांचा कसा बसा गुजारा होई. पुढें मोटरी आल्या आणि टांग्यांची वहिवाट कमी होत चालली. एकामागून एक टांगेवाले बेकार झाले. कोणी मोटरींचे दलाल बनले, कोणी गांव सोडून गेले, कोणी घरींच बसले. मीरांसाहेबही असाच घरीं बसला आणि अखेर कशानें तरी आजारी पडून योग्य इलाज न झाल्यामुळें त्यांतच गमावला.

त्यावर टांगा–घोडा येईल त्या किंमतीला विकून टाकून दहा बारा वर्षांच्या नसीमला घेऊन तिची आई देहरादूनला आली.

वर्ष दोन वर्षें इकडे तिकडे घरकाम केल्यानंतर तिच्या आईला एका आडबाजूच्या हॉटेलमध्यें देखरेख करण्याचें आणि भटिआरणीचें काम मिळालें तिथेंच त्या दोघी राहूं लागल्या.

* * *

हॉटेलमध्यें येऊन राहिल्याला त्यांना वर्ष सव्वा वर्ष झालें असेल. रात्रींच्या त्या नेहमींप्रमाणेंच स्वयंपाकघरांत निजल्या होत्या. बाहेरच्या अंगाशीं एक दोन नोकर निजलेले आणि शेजारच्या एका खोलींत मालक निजला होता. सरासरी मध्यरात्रींच्या सुमाराला केव्हांतरी नसीम जागी झाली आणि पाहाते तों शेजारी आई नाहीं. तिनें सहजच मोठ्यानें हाक मारली. तेव्हां शेजारच्या मालकाच्या खोलींतून ती लगबगीनें आली आणि नसीमची कांहींतरी समजूत घालून नेहमींप्रमाणें तिच्या शेजारीं निजली. पण आईला रात्रीं मालकाच्या खोलींतून आलेली पाहून नसीमला मोठें चमत्कारिक वाटलें.

ती आतां लहान नव्हती. पोरपणाच्या प्रदेशाची सरहद्द पार करून त्याबाहेरच्या अज्ञात आणि अद्भुत प्रदेशांत पाऊल टाकण्याच्या बेतांत होती ती. अचानक वेगळ्याच वाढीला लागल्यामुळें तिच्या शरीरांत एक प्रकारची अननुभूत रसरस आणि चित्तवृत्तींत अस्फुट अस्वस्थता उत्पन्न झालेली होती. सगळें जग जणूं कांहीं वेगळेंच दिसूं लागलें होतें तिला. हॉटेलच्या नोकराचाकरांच्या थट्टामस्करींतला अर्थ तिला आतांपर्यंत उमगत नसे, तो आतां थोडा थोडा उमगूं लागला होता. आणि त्यामुळें तिला कसें संकोचल्यासारखें होऊं लागलें होतें.

म्हणूनच त्या रात्रीं आईला मालकाच्या खोलींतून आलेली पाहातांच नसीमच्या मनांतून एक चमक येऊन गेली. तिला आईबद्दल एक प्रकारचा विचित्र परकेपणा वाटूं लागला आणि तिच्याबद्दलचा स्नेह आणि आदर नाहींसा झाला. तेव्हांपासून तिची आईबरोबर वागण्याची वृत्तिच बदलली आणि तिला त्या ठिकाणाचा आणि राहाणीचा विलक्षण वीट आला. राजपूरच्या आठवणी तिच्या मनांत फिरून जोरानें उसळूं लागल्या. संध्याकाळची अझान ऐकली कीं तिला आफताबची आठवण येई आणि राजपूरचें सगळें

जीवन आठवे. देहरादूनला आल्यापासून आफ्ताब तिला दिसला नव्हता. तो दिल्लीला किंवा दुसऱ्या कोठें तरी रोजगाराकरतां गेला असें तिच्या आईजवळ कोणाला तरी बोलतांना तिनें एकदा ऐकलें होतें, तेवढीच तिला त्याची माहिती मिळाली होती. पण त्याची आठवण झाली कीं तिला वाटे, केव्हां तरी आफ्ताब पुन्हा आपल्याला भेटेल, आपण त्याच्याबरोबर निघून जाऊं आणि इथल्या जहन्नममधून बाहेर पडूं.

* * *

असें वाटतां वाटतां दिवसांमागून दिवस जात चालले, तसें मायलेकींतलें अंतरही वाढत चाललें.

त्या दिवशीं मस्तानशहाचा उरूस होता. संध्याकाळीं ती आणि आई उरूस पाहून आली होती आणि आतां रात्रीं गिऱ्हाइकांचीं जेवणें-बिवणें आटपून निजानीज व्हायच्या बेताला बाकीचे नोकर उरुसाला गेले होते.

रात्रीं दहाचा सुमार होता. नसीम निजण्याची तयारी करीत होती, तितक्यांत तिची आई तिला म्हणाली,

" नसीम, तीन नंबरच्या खोलींत संध्याकाळीं नवीन इसम आलेला आहे त्याला पाणी नेऊन ठेव. जा बेटी."

त्यावर नसीम एकदम फणकाऱ्यानें म्हणाली,

"मी नेणार नाहीं. मी तुला कितीदा सांगितलं आहे कीं असलं कांहीं काम तूं मला सांगत जाऊं नकोस. अशानें मी एखाद दिवशीं निघून जाईन इथून, नाहींतर जीव देईन संखिया खाऊन."

"संखिया खाऊन? हें शहाणपण तुला कुणीं शिकवलं? आणि निघून जाईन म्हणून मला म्हणत असतेस, ती जाणार कुठें तूं? त्या आफ्ताबकडे दिल्लीला? दिल्लीच्या वेशीवर वाटच पाहात बसला असेल तुझी तो. कधीं एखादी चिठ्ठी

तरी पाठवली का त्यानें ? इथें माझ्या नजरेसमोर आहेस हें नशीब समज. नाहींतर रात्रीं इथें पोरी येतात त्यांची स्थिति पाहा. आज इथें आहेत, उद्यां कुणाला विकल्या जातील. जा, मुकाट्यानें पाण्याचा लोटा घेऊन जा. कोणी कांहीं खात नाहीं. आणि आज नाहीं उद्यां ..."

"मला माहिती आहे पाणी घेऊन जायचं म्हणजे काय तें. आज जातें पण पुन्हा कधीं जाणार नाहीं."

* * *

दार ढकलल्याचा आणि बांगड्या किणकिणल्याचा आवाज एकदमच त्याच्या कानांवर पडला. त्यानें तोंडासमोरचें पुस्तक बाजूला सारलें, हातांतली सिगरेट झटकली आणि किंचित् वळून दाराकडे नजर टाकली. नसीमवर नजर पडल्याबरोबर तो ताडकन् उभा राहिला आणि सामोरा होत म्हणाला,

"शबनम् !"

तें नांव कानांवर पडतांच तिच्या हातांतला पाण्यानें भरलेला आबकरा सुटून दारांतच पडला आणि तीही एकदम तोल सावरीत दाराच्या चौकटीवर कलंडली. आणि मग एक पाऊल पुढें टाकून पलंगाच्या दांडीला धरून उभी राहिली.

खोलींतला आधींचाच पिवळसर मंद प्रकाश सिगरेटचा धूर दाटल्यामुळें आणखी धूसर झाला होता. त्याचा तिखट वास, त्यांतच सेण्टचा दर्प आणि दारूचा कोंदट भपकारा ह्यांमुळें त्या हाकेनें आधींच स्तिमित झालेल्या तिला आणखी गुदमरल्यासारखें झालें आणि ती निश्चलपणें त्याच्याकडे पाहात उभी राहिली ...

सिनेमानटींचें उत्तान चित्र असलेलें एक पुस्तक त्याच्या उजव्या हातांत होतें. डाव्या हातांत बोटापर्यंत जळत आलेली सिगरेट होती. छातीवर दोन बटनांच्या मधल्या जागेंत

किरमिजी रेशमी रुमाल खोवलेला होता आणि वीतवीत केस पिंजारलेले होते ...

गाल भरलेले, दाढी मिशा नवीनच वाढलेल्या, चेहेऱ्यावर सुखावलेला मांसलपणा आलेला, पण बघण्यांत आणि चर्येत निर्मळ खुलासपणा नव्हता. त्यानें पुन्हा म्हटलें,

"शबनम्!"

आफ्ताबच. पण किती बदललेला, किती वेगळा. त्याच्या तोंडची ती हाक, ती दोघांनाच माहिती असलेली हाक, ऐकतांच तिला खरोखरच अंतःकरणांत उत्फुल्ल वाटायचें, पण आतां ती हाक ऐकून तिच्या कानांत किर्र होऊन अंगावर कांटा आला आणि वाटलें, एकदम परतावें. पण तिचा पाय उचलेना.

"शबनम्, तूं इथें!" तिला हातानें धरून पलंगावर बसवीत तो म्हणाला.

त्याच्या शब्दागणिक दारूचा भपकारा येत होता. तिला काय करावें तें कळेना. तिच्या तोंडून शब्दही निघेना किंवा त्याच्याकडे पाहावेनासुद्धा.

थोडा वेळ गेल्यावर जरा सावरून ती दृढपणें म्हणाली,

"मी जाऊं?"

"पण मला सांग, तूं इथें कशी? कधीं आलीस?"

"कां? तुला फार आश्चर्य वाटलंसं दिसतं!"

"अर्थात्."

"कां? तूं कधीं चौकशी केलीस? कधीं चिठ्ठी तरी पाठवलीस?"

"तूं इथें आहेस हें मला काय माहिती? मी इथें एकदा दोनदा येऊन गेलों आहें कंपनीच्या कामासाठीं ..."

"इथें? इथ्थें येऊन गेलास आणि तरी माझी आठवण झाली नाहीं?"

तो पुढें बोलूं लागला,

" पण मला काय ठाऊक तूं इथे आहेस? मी आलों म्हणजे नेहमीं इथेंच उतरतों. मागल्या खेपेला आलों तेव्हां ती मुनीर – तुला ठाऊक असेल – तिला मीं नेली. आतां ती देवी मनोरमा म्हणून आमच्याकडे मोठी 'स्टार' झाली आहे. फिल्म कंपनीसाठीं इकडून चांगल्या खूपसुरत मुली नेण्याचं काम मी करीत असतों; तुला इथें कसं वाटतं?...

" बाकी इथला मालक मोठा खप्पी आहे अं..." त्याची बडबड चालूच होती... " चांगल्या घरच्या लेकीसुनासुद्धा गिऱ्हाइकांसाठीं हेरून आणतो; निदान सांगतो तरी तसं. आणि दिसतातही खऱ्या त्या तशा. तुलाही तो गिऱ्हाइकांकडे पाठवतो असं दिसतं...

" बाकी शबनम्, तुझे डोळे अजून शबनम्सारखेच आहेत अं. तुला आठवतं? एकदा आपण सकाळींच चाललों होतों आणि तूं म्हणालीस..."

तिला तिथें बसणें अगदीं असह्य झालें. त्याच्या तोंडचें एक अक्षरही ऐकवेना तिला. ज्याच्यापुढें आपलीं सगळीं दुःखें ओकण्यासाठीं इतके दिवस ती थांबली होती, त्याच्यापुढें एक उसासादेखील टाकायला तिचें मन घेईना. ज्याच्या सोबतीनें सबंध आयुष्य घालवण्यासाठीं ती उत्कण्ठ झाली होती, त्याच्या शेजारीं एक क्षणही तिला राहावेंसें वाटेना.

एक झटका देऊन ती निघाली आणि विजेसरशीं दारापर्यंत जाऊन पोचली.

" शबनम् " त्यानें पुन्हा हाक मारली. तिनें आपले दोन्ही ओठ दाबून धरले होते. डोळ्यांतून ओसंडून पाहणारीं आसवें आंतल्या आंत परतवण्याचा ती आटोकाट प्रयत्न करीत होती. तिला रडूं उसळून येत होतें, पण त्याच्यासमोर आपल्या हृदयाचा बांध फुटूं द्यायला ती तयार नव्हती.

सगळें बळ एकवटून तिनें आवंढा गिळला आणि ती दाराबाहेर पडली.

" म्हणजे ? मला समजत नाहीं. " तो म्हणाला.

" तुला समजायचं नाहीं, पण मला चांगलं समजलं. " एवढे शब्द तिच्या दाटलेल्या गळ्यांतून कसेबसे बाहेर पडले आणि ती झपाट्यानें नाहींशी झाली.

आणि धूसर आकाशाच्या रिकाम्या पार्श्वभूमीकडे तो शून्य दृष्टीनें पाहात राहिला.

# शि ष्या

"अरे, ही तर ती!" तिला पाहातांच एकदम माझ्या मनांत आलें. एवढ्यांत मी तिला मागें टाकून दोन चार पावलें पुढें गेलों होतों, तो परत फिरलों. फिरूं नये, पण फिरलों आणि जिकडून आलों होतों, त्याच म्हणजे पोस्ट ऑफिसच्या बाजूला चालूलों. हेतु अर्थात् मनांत हा कीं, त्या टोकाकडून पुन्हा परतावें आणि नीट पाहून खात्री करून घ्यावी.

तुम्हांला, निदान तुमच्यापैकीं पुष्कळांना, हें माहीतच आहे कीं, दिल्लीमध्यें सभ्य आणि हौशी मंडळींना—स्त्रियांना आणि पुरुषांनाही—हिंडाफिरायला जाण्याजोगें ठिकाण एकच आहे आणि तें म्हणजे 'कॉनॉट प्लेस!' त्यामुळें दिल्लीला असलें कीं, कॉनॉट प्लेसमध्यें रोज फिरायला जायचें असा माझा नियम आहे आणि त्याप्रमाणें मी त्याही दिवशीं गेलों होतों.

माझें पहिल्यांदा तिच्याकडे लक्ष गेलें तें तिच्या बरोबरच्या डॉल्मेशनमुळें. बायकांच्याबरोबर फिरतांना कुत्रीं असायचीं, तीं बहुतेक पॉम, पेकिनीज्, डाकसूण्ड आणि फारच मोठें झालें तर कॉकर स्पॅनियल. पण अल्सेशन, डॉल्मेशन, बॉरझॉई ह्यांसारखा मोठा कुत्रा सहसा दिसायचा नाहीं! आपल्या बायकांबरोबर तर नाहींच नाहीं. त्यामुळें हा भरदार आणि डौलदार डॉल्मेशन घेऊन हिंडणारी ही बाई कोण म्हणून मीं जरा मुद्दाम बघितलें होतें. तिचाही बांधा तसाच भरदार आणि डौलदार होता. पिकलेल्या लिंबासारख्या रंगाचें काळ्या कांठाचें पातळ, काळाच ब्लाऊझ, काळे पण न चकाकणारे केस, पायांत काळ्या मखमली सॅण्डल्स आणि कुत्र्याच्या गळ्याला बांधलेला कोरा करकरीत काळा पट्टा. तो डॉल्मेशन आणि ती अशीं दोघेंही अशा सहज डौलांत चाललीं होतीं कीं वाऱ्याच्या झोताबरोबर पालापाचोळा खेंचला जावा तशा आसपासच्या नजरा त्यांच्याबरोबर खेंचल्या जात.

माझ्या इच्छेप्रमाणें, परत फिरतांना मीं तिला नीटपणें पाहिलें. तीच ती. काय सणसणीत वाढली होती चारपांच वर्षांत! आतां ओळखील कीं नाहीं कोण जाणे! असा विचार करीत, तिच्याकडे बघत, पण सारखा बघतों आहें असें दिसूं नये अशी सावधगिरी घेत, मी चाललों होतों. तितक्यांत तीही जवळ आली आणि थांबली. माझ्यांत आणि तिच्यांत तीनचार पावलांचें अंतर असेल. मी पुन्हा पुन्हा बघत होतों म्हणून मला झाडण्यासाठीं कीं दुसऱ्याच कांहीं कारणामुळें ती थांबली, मला कळेना. मनांत मी थोडासा ओशाळलों होतों, इतक्यांत...

"हॅलो, सर, तुम्ही इथें?" हे तिचे शब्द माझ्या कानांवर पडले आणि मी स्तंभित झालों. म्हणजे अगदीं जागच्या जागीं थांबलों.

एका क्षणापूर्वींची माझ्या मनाची ओशाळगत स्थिति, त्यापूर्वींच कांहीं मिनिटें तिचें रूप आणि डौल पाहून माझ्या

मनांत उत्पन्न झालेले विकारतरंग, एक वेळ मी तिचा शिक्षक असतांना, आणि विशेष म्हणजे तो तसा प्रसंग घडला असतांना, माझ्या मनांत तसा विकार यावा ही गोष्ट आणि आतां तिनें मला 'सर' म्हटल्यामुळें मी एके वेळीं तिचा शिक्षक होतों ह्याची मला पुन्हा नव्यानें झालेली जाणीव, ह्या सर्व प्रकारांमुळें माझ्या मनाची स्थिति खुराड्यांतल्या खुराड्यांत फडफडाट करणाऱ्या कबुतरासारखी झाली होती.

अर्थात् माझ्या मनांत हा गोंधळ चालू असतांनाच बाहेरून मीं स्वतःला सावरून घेतलें होतें. माझे कपडे ठाकठीक आहेत कीं नाहींत, हें उगीचच पाहून बुटाला पॉलीश नसल्याबद्दल मनांतल्या मनांत दोषही देऊन घेतला होता आणि तिला उत्तरही दिलें होतें,

" मी, मी इथें आलोंयू नुकताच कांहीं कामासाठीं. तुम्हीं ?"

"आम्ही इथेंच असतों वॉर सुरू झाल्यापासून. तुम्ही किती दिवस राहाणार आहां इथें ?"

"तसं कांहीं नक्की नाहीं." वास्तविक नक्की होतें; पण चार-पांच दिवसच सांगणें बरें दिसेल का दहा-पंधरा दिवस सांगावें हें मला समजेना. खरें म्हणजे तिच्याबद्दल मला कुतूहल होतें, पण कांहीं कुतूहल नाहीं असें मी आपल्या मनाला सांगत होतों. अखेर कांहींतरी सांगायचें म्हणून मीं सांगितलें, " पण चार पांच दिवस तरी आहें."

"मग तुम्ही आलं पाहिजे आमच्याकडे. कधीं येतां ? आजच या. उद्यां रविवार आहे, उशीरबिशीर झाला तरी चालेल. साडेआठ-नऊपर्यंत केव्हांही आलांत तरी चालेल. पण सर, या हं मात्र. मी वाट पाहीन."

आणि मला आपला पत्ता सांगून ती चालूं लागली.

* * *

ती माझ्या मागें निघून गेल्यानंतर मला अगदीं मोकळें वाटलें आणि मी विचार करूं लागलों. पण विचार करणें शक्य नव्हतें. माझ्या मनांत अनेक आठवणींचें नुसतें तुफान उठलें होतें. मला कुठे तरी तास अर्धा तास बसणेंच जरूर होतें. म्हणून फुटपाथवरून न जातां मधलें मैदान आडवें कापून मी 'इण्डिया कॉफी हाऊस' मध्यें गेलों. तेथें डाव्या अंगाला भिंतींत, कोनाड्यासारख्या आंत गेलेल्या, बसायच्या जागा आहेत. त्यांपैकीं एकींत शिरलों, पडदा ओढून घेतला आणि आणायला कमींत कमी अर्धा तास तरी लागेल अशा दोन-चार पदार्थांची ऑर्डर दिली.

* * *

बसकट टेबलाखालीं पाय ताणून खुर्चीच्या पाठीवर मीं मान टाकली मात्र आणि मनाच्या मैदानावर आठवणींचे घोडे बेलगाम उधळूं लागले......

* * *

मला तिची शिकवणी होती. मी संस्कृत आणि इंग्लिश शिकवीत असें. हे दोन विषय शिकवण्याच्या कामीं माझें बऱ्यापैकीं नांव होतें. म्हणूनच बहुधा, मी तिच्या शाळेंतला शिक्षक नसतांना देखील तिच्या वडिलांनीं माझी शिकवणी ठेवली असावी. नंदिनी मंदबुद्धि मुळींच नव्हती. पण तिचें लक्ष नसे अभ्यासाकडे. घरांतही कोणाला तिच्याकडे लक्ष देतां येत नसे. पण तिच्या वडिलांना वाटे तिनें चांगलें पास व्हावें.

मीं दोन वर्षें, सहावींत आणि सातवींत, तिला शिकवलें. तिची आई सतत आजारी असे म्हणून वडिलांनीं वरळी सी-फेसवर मुद्दाम घर घेतलें होतें. त्यांचा ड्रायव्हर मला न्यायला मोटर घेऊन यायचा आणि शिकवणी झाल्यावर घरीं पोचवायचा.

दोन वर्षें पार पडलीं.

मॅट्रिकची परीक्षा चालू होती.

मी रोज दुपारीं आणि संध्याकाळीं परीक्षेच्या हॉलकडे जाऊन तिचे पेपर कसे गेले ह्याची चौकशी करीं.

संस्कृतचा पेपर झाला होता, तो दिवस.

परीक्षेच्या हॉलकडून ती आणि मी मोटरींतून तिच्या घराकडे निघालों होतों. पेपर चांगला गेला होता. मी उत्सुकतेनें प्रश्नामागून प्रश्न घेऊन "हा कसा लिहिला? ह्याचं काय केलं?" असें विचारीत होतों.

"आतां इथें नको. आतां मला कांहीं सांगतां येणार नाहीं. मला कंटाळा आला आहे. घरीं गेल्यावर बघूं." असें तिने मला उत्तर दिलें होतें.

मला वाटलें मीं उगीचच उतावळेपणा केला. मला मग संकोचल्यासारखें झालें आणि संकोच घालवण्यासाठीं मी कांहींतरी विषय काढून बोलत राहिलों.

आमचें बोलणें चाललें होतें, तों मध्येंच एकदम कोठें तरी गाडी कलल्यासारखी कीं हिसळल्यासारखी झाली आणि नंदिनी सपशेल माझ्या अंगावर आली. थोडा वेळ टेकली. मला एकदम कसेंसेंच झालें. तेवढेंच. पळभरानंतर गाडी पुन्हा सरळ चालू झाली आणि आम्ही दोघें आपापल्या कोपऱ्यांत पूर्वीप्रमाणें बसलीं राहिलों.

एवढ्यांत बंगला आलाच. आम्ही वर डाव्या अंगाकडल्या नंदिनीच्या खोलींत गेलों. उजव्या अंगाला तिच्या आईची खोली असे.

मी टेबलाशीं पेपर पाहात बसलों. नंदिनी तोंडबिंड धुवायला आणि आईला भेटायला गेली.

ती परत आल्यावर, चहा-फराळाचें आलें होतें तें घेऊन आम्ही आमच्या कामाला लागलों.

आम्ही समोरासमोर न बसतां टेबलाच्या कडेला काटकोन करून बसत असूं तशीं बसलों आणि मग आपण प्रत्येक प्रश्न कसा लिहिला तें ती सांगूं लागली.

पुढें मला कांहीं शंका आलीशी वाटली, म्हणून मीं पेपर तिच्या हातून घेतला आणि स्वतः पाहूं लागलों. ती माझ्या शेजारीं पण किंचित् मागच्या बाजूला येऊन उभी राहिली. माझ्या खांद्यावरून ती पेपराकडे बघत होती. मधूनच तिचा एखादा मंदोष्ण श्वास माझ्या मानेला किंवा कानाला लागायचा. मी तिला कांहीं प्रश्न विचारीत होतों आणि ती उत्तर देत होती...

इतक्यांत तिची हनुवटी माझ्या खांद्याला टेकली आणि तिचा गाल माझ्या कानाला लागला. त्याबरोबर तिनें नुकत्याच लावलेल्या पावडरीचा आणि केसाच्या तेलाचा असा मिळून एक मंद-मादक गंध आला. मला गुदमरल्या-सारखें झालें. आधीं तिची हनुवटी खांद्याला लागल्याबरोबरच मी चमकलों होतों, त्यांत तो मोटरीचा प्रसंग ! सगळा एका क्षणाचाच प्रकार असेल.

मी ताडकन् उठलों आणि खाड्दिशीं तिच्या मुस्कटांत मारली.

ती अगदीं स्तिमित—वीज पडल्याप्रमाणें स्तिमित—होऊन उभी राहिली आणि डोळे सताड उघडून माझ्याकडे पाहूं लागली. तिला माझा राग आला कीं वाईट वाटलें कीं अपमान वाटला कीं काय झालें, मीं मुळींच विचार केला नाहीं...

मीं ताबडतोब टोपी उचलली, वहाणांत पाय सरकवले आणि तशाच फरफटवीत बाहेर पडलों.

* * *

घरीं गेल्यावर मीं झाल्या गोष्टीचा विचार केला. मला कोठेंही माझी चूक झाली असें वाटलें नाहीं, पण मनुष्यस्वभावाची गंमत वाटली.

नंदिनी इतकी सरळ आणि जगाविषयीं अजाण होती कीं, शिकवतांना माझीच कित्येकदा पंचाईत होत असे.

एकदा मला तिला ' गणिका ' शब्द समजावून द्यायची वेळ आली. मीं म्हटलें, " गणिका म्हणजे वेश्या. ' वारस्त्री गणिका वेश्या . . . ' अमरकोशांत आलेंच आहे. "

" वेश्या म्हणजे काय पण ? " तिनें विचारलें.

" वाईट चालीची स्त्री. "

" म्हणजे, चोऱ्या करणारी, खोटं . . . "

" त्याहून वाईट. "

" म्हणजे ? "

" म्हणजे अनीतिमान् . . . "

" पण चोऱ्याबिऱ्या करणं अनीतिच नाहीं कां ? . . . "

" तशी अनीति नव्हे — वेश्या म्हणजे पैशासाठीं वाटेल त्याच्याशीं संबंध ठेवणारी . . . "

" कसे संबंध ? "

' डोंबल माझं ! ' मीं मनांत म्हटलें आणि अशा प्रसंगांतून सुटण्यासाठीं मास्तर लोक नेहमींच जसें करतात तसें कांहीं तरी थातुरमातूर करून मीं तो प्रसंग पार पाडला किंवा टाळला. ती मुलगी आज माझ्याशीं अशी वागली ह्याचा मला अर्थ कळेना. तिच्या मनांत माझ्यासंबंधीं कांहीं विकार उत्पन्न झाला कीं सहजच असें झाले ?

अखेर मीं तो विषय आपल्या मनांतून काढून टाकला. म्हटलें, ' कांहीं कां असेना ! आपल्याला काय करायचं आहे त्याच्याशीं ? आतां कांहीं लागाबांधा राहिला नाहीं. '

त्यानंतर ती पास झाल्याचें मीं पाहिलें. ती चांगल्या रीतीनें पास झाली होती.

त्यावर तिच्यासंबंधीं मला कांहीं माहिती नव्हती.

* * *

पुढें सात आठ महिन्यांनीं कोर्टांत आलेल्या एका प्रकरणांत तिचें नांव मीं पाहिलें. तिच्या वडिलांनीं त्यांच्याच ड्रायव्हरवर तिला पळवून नेल्याबद्दल फिर्याद लावली होती.

अशा रीतीनें कोर्टात आणि इतरत्र तिचें नांव इकडे तिकडे फेकलें जावें आणि तिची अशी फरफट व्हावी ह्याचें मला वाईट वाटलें.

" काय मास्तर, ही तुमची विद्यार्थिनी तीच ना नंदिनी ?" कोणीतरी विचारी.

मीं म्हणावें, " हो. काय प्रकरण आहे कोण जाणे ! "

खटला बराच गाजला, साक्षी पुरावे झाले, तिचीही साक्ष आणि तपासणी झाली.

अखेर, मला वाटतें, गुन्हा शाबीत होत नसल्यामुळें ड्रायव्हर सुटला.

त्यानंतर मात्र मला तिची कांहीं खबर नव्हती, ती त्या दिवशीं कॉनॉट प्लेसमध्यें दिसेपर्यंत.

* * *

मनसोक्त उधळल्यानंतर आठवणींचे घोडे शांत झाले.

नंतर मी तेथून उठलों आणि रात्रीं परत तिच्या घरीं जायचें म्हणून त्या तयारीला लागलों.

आठवणींचें तुफान ओसरलें, पण माझें मन तिच्यासंबंधीं कांहीं निश्चित भूमिका घेऊं शकत नव्हतें. मला तिच्याशीं भेटायूबोलायूची इच्छा होती हें खरेंच. ती माझ्याशीं ज्या प्रकारानें बोलली, त्यावरूनच तिचें मन माझ्या बाबतींत साफ होतें असें दिसलें. पण माझें मन बुचकळ्यांत होतें ! " आम्ही इथेंच आहों, " असें ती म्हणाली होती. " आम्ही " म्हणजे कोण ? तिच्याबरोबर आणखी कोण असेल ? तिनें लग्न केलें असेल का ? ती मला अगदीं " हॅलो सर " म्हणाली. अगदीं मॉडर्न दिसते. पण ती सरळ आणि खरी मॉडर्न आहे कीं नुसती उच्छृंखल ? असे अनेक प्रश्न माझ्यापुढें आले.

नंदिनी माझी आवडती विद्यार्थिनी होती. सुंदर म्हणूनच नव्हे. सुंदर तर ती होतीच, पण हुशार, तडफदार म्हणून.

योग्य जमिनींत जसें बीं रुजावें, तसें शिकवलेलें तिच्या मनांत रुजे. तिचा समज, तिचें ज्ञान वाढतांना पाहातांना मला मौज आणि आनंद वाटे. म्हणून मला तिला पुन्हा जवळून पाहाण्याची उत्कंठा होती.

★ ★ ★

कॉनॉट प्लेसच्या बाहेरच्या बाजूला खाजगी घरांची एक वसाहत आहे, तेथेंच त्यांचा बंगला होता.

मीं घंटा वाजवल्याबरोबर नोकर बाहेर आला आणि म्हणाला,

“ जी साब ? ”

“ बाईसाब हैं ? ”

“ जी ” असे म्हणून आंत जाऊन वर्दी देऊन तो बाहेर आला आणि त्यानें मला आंत नेऊन एका कोचावर बसायला सांगितलें.

दिव्यावर नारिंगी रंगाचें शेड लावलेले होतें. कोचाखुर्च्यांवरचें कापड जाड, हातविणीचें, गेरुवा रंगाचें, देशी पद्धतीचीं काळीं चित्रें वगैरे काढलेले होतें. भिंतींना फिकट पिवळा ऑइलपेन्ट होता. सगळीकडे नारिंगी रंगाची प्रभा फाकली होती. जवळच एका छोट्या टेबलावर एक मोठा तुकतुकीत शंख ठेवलेला होता, त्याच्या स्वच्छ गुलाबी अंतर्भागावर नारिंगी प्रभा विशेष खुलून दिसत होती. त्याच्या मागल्या बाजूला एक निमुळत्या गळ्याचें मुरादाबादी पुष्पपात्र चकचकीत पॉलीश केलेलें होतें. माझें लक्ष तिकडे होतें, तोंच पडदा सारल्याचा आवाज झाला, म्हणून मीं वर पाहिलें.

ह्या वेळीं तिने रुंद काळी बॉर्डर लावलेला सफेद साटिणीचा चिनी पद्धतीचा जाकीट पायजमा घातला होता आणि दोन्ही हातांनीं एक पांढरा गुबगुबीत ससा उचलून धरला होता. त्याचे डाळिंबी डोळे लुकलुकत होते.

माझ्या समोरच ती बसली आणि म्हणाली,

" बसा, नीट बसा ना!" तिचे हे शब्द ऐकल्यावर माझ्या लक्षांत आलें कीं मी त्या मऊ श्रीमंती कोचावर अंग चोरून अवघडून बसलों होतों. ती बोलतच होती, " आणि आतां सांगा, तुम्ही इथें कसे? हल्लीं तर कांहीं शाळांना सुटी नाहीं."

मीं म्हटलें, " मी हल्लीं शाळेंत नसतों. मागें मुंबई सोडून लोक भराभर जाऊं लागले—पुढें चळवळ सुरू झाली—त्यांत मुलें खूप कमी झालीं, म्हणून आमच्या शाळेनें कांहीं वर्ग बंद केले, त्यांत आम्हीही सापडलों."

" मग आतां काय करतां?"

" आतां मी एका व्यापारी कंपनींत नोकरी धरली आहे. आमच्या साहेबांना दर महिना-दोन महिन्यांनीं इथें सप्लाय खात्यांत वगैरे कांहीं कामासाठीं यावं लागतं. तेव्हां त्यांच्याबरोबर मीही येतों. मी त्यांचा पर्सनल सेक्रेटरी आहें."

" असं का? बरं झालं तुम्हीं मास्तरची नोकरी सोडलीत तें."

तिचा तो अभिप्राय ऐकून मी थोडासा दचकलों. मग थांबून म्हणालों,

" पण मला तें काम आवडत असे."

" तें ठीक आहे. आणि तुम्ही शिकवीतही होतां चांगलं. तुम्हीं मला जें संस्कृत शिकवलंत, त्याच्या जोरावर मी अजून इथल्या लोकांवर माझ्या संस्कृतच्या ज्ञानाची छाप पाडतें..."

मला तो 'वारस्त्री गणिका वेश्या'चा प्रसंग आठवला त्या वेळीं.

" मी त्याबद्दल नाहीं म्हणत. पण...रागावूं नका तुम्ही. तुम्हांला माणसाचं मन कळत नाहीं. निदान कळत नसे आणि तुम्ही अविचारानें वागायचेत."

तिचा रोख मला कळल्याखेरीज राहिला नाहीं. मीं म्हटलें,

" तुम्ही त्या दिवशींच्या माझ्या वागण्याबद्दल म्हणत असाल."

“ अर्थातच. ”

“ त्या दिवशींचं माझं वागणं तुम्हांला चमत्कारिक वाटलं असेल आणि माझा रागही आला असेल, पण माझं करणं चुकलं, असं नाहीं मला वाटत. ”

“ तुमचं करणं मला चमत्कारिक तर वाटलंच आणि रागही आलाच. वाटलं, पुन्हा तुमचं तोंड कधीं पाहूं नये. पण तुमचं करणं चुकीचं होतं असंही मला म्हणायचं आहे. आतां माझं त्यामुळें मोठंसं नुकसान झालं नाहीं, हें निराळं. ”

“ तें कसं ? ”

“ असं आहे, पहिलं म्हणजे अशा आपल्या वागण्याचा मुलीच्या मनावर काय परिणाम होईल त्याचा तुम्हीं विचार केला नाहीं. ”

“ पण तुमचंही वागणं चुकलं नाहीं का ? तुम्ही माझ्याशीं जी लगट केलीत ...”

“ लगट ? ”

“ लगटच. माझ्या खांद्यावर तुमची हनुवटी टेकलीत, कानाला गाल ...”

“ मग खासच तुमची चूक झाली. तुम्ही पेपर बघत होतां. मी मार्जिनमध्यें घाईघाईंत किरट्या अक्षरांत कांहीं तरी लिहिलं होतं तें पाहात होतें. म्हटलं तें काय लिहिलं तें कळलं, म्हणजे मी तुम्हांला मीं पेपरांत काय लिहिलंय तें नीट सांगूं शकेन. म्हणून मी वांकलें आणि माझी हनुवटी नि गाल तुम्हांला लागला असेल. पण त्यांत लगट करण्याचा माझा बिलकुल इरादा नव्हता. तसं तुम्हांला कां वाटलं मला कळत नाहीं. तुमचं शिकवणं मला आवडे आणि तुमच्याबद्दल मनांत कधींमधीं विचारही येत. पण तुमच्याशीं लगट करण्याचा विचार मात्र कधीं माझ्या मनाला शिवलाही नाहीं. अशा स्थितींत तुम्ही माझ्याशीं तसे वागलांत त्यामुळें माझ्या मनाची काय स्थिति झाली असेल. कल्पना ... ”

...५१

"कदाचित् माझं चुकलं असेल. पण त्याच दिवशीं मोटरींतही माझ्या अंगाशीं आलां होतां..."

"कधीं?"

"त्याच दिवशीं. पेपर संपल्यावर परत येतांना दादरचा रस्ता सोडून गाडी सी–फेसकडे वळली तेव्हां."

"माझ्या तर कांहींच लक्षांत नाहीं. त्या दिवशीं तुमच्याच तर मनांत कांहीं चलबिचल झाली नव्हती ना? त्यामुळें माझं प्रत्येकच वागणं तुम्हांला विशेष अर्थाचं दिसलं असेल."

"कोण जाणे. तुम्ही आतां हें सुचवीपर्यंत तरी तसा विचार मीं केला नव्हता. आतां कदाचित् केला तर तसं असल्याचंही दिसून येईल, असो. पण त्या दिवशींच्या प्रकाराबद्दल, इतक्या वर्षांनीं कां होईना, संधि आली आहे, तर तुमची मी मनःपूर्वक क्षमा मागतों. माझे हेतु शुद्ध असतील, पण वागणं चुकलं असंच म्हटलं पाहिजे."

"क्षमा मागायची गरज नाहीं कांहीं. कारण मीं सांगितलंच कीं माझं कांहीं विशेष नुकसान झालं नाहीं. पण समजा, जरी माझ्या मनांत कांहीं तशी भावना असती, तरी तुम्ही नुसते बाजूला सरलां असतांत तरीही मी माझी चूक ओळखून सावध झालें असतें आणि तुम्हांला पुढेंमागें मला समजावून देतां आलं असतं. पुढेंपुढेंही ज्या कांहीं घडामोडी झाल्या, त्यांत मला तुमचा आधार मिळाला असता. माझा तुमच्यावर विश्वास होता. मी किती तरी गोष्टी तुम्हांला लहान मुलीसारखी विचारायची आणि तुम्ही मला समजावून देत असां...

"त्यानंतर पुष्कळच गोष्टी घडल्या.

"परीक्षा कशी तरी पार पडली...

"त्यानंतर कांहीं दिवसांनीं आई वारली. वडिलांनीं आईसाठीं ठेवलेल्या नर्सशीं लग्न केलं...

" मी कॉलेजांत गेलें, पण ती नर्स मालकीण झाल्यापासून घरांत माझी स्थिति परक्यासारखी, चोरट्यासारखी, किंबहुना कैद्यासारखी झाली.

" मला थोडंबहुत बोलायलाचालायला, धीर द्यायला एकच्च गृहस्थ होते. आमचा ड्रायव्हर. ते मॅट्रिक झालेले होते. मेकॅनिकचा एक कोर्स पुरा केलेले होते. वर्कशॉप काढण्यासाठीं पैसे जमवण्याकरितां ते ड्रायव्हरची नोकरी करीत होते...

" अतिशय सज्जन आणि सुज्ञ होते...

"...एक दिवस मी त्यांच्याबरोबर घर सोडून निघून गेलें."

" तुम्ही आपण होऊन गेलां होतां? पण कोर्टांत तर तुमच्या वडिलांनीं..."

"...त्यांच्यावर फिर्याद लावली होती. पण खरोखर मी आपण होऊन गेलें होतें. पहिल्यांदा उतावळेपणानें गेले होते, पण खटल्यानंतर घरीं राहिलें त्या अवधींत विचार केल्यावर माझी खात्री झाली कीं त्यांच्याशींच आपल्याला लग्न करायचं. आणि त्यानंतर एक दिवस संधि साधून मी पुन्हा घरांतून बाहेर पडलें..."

★ ★ ★

ती बोलत असतांनाच कोणाचीं तरी आंत येतांना पावलें वाजलीं...

नंदिनी उभी राहिली, मीही उभा राहिलों. नंदिनी आलेल्या गृहस्थांना सांगत होती,

" हे आमचे सर, ओळखलं असेलच्च, आणि..."

तिनें आम्हां दोघांकडे आळीपाळीनें पाहिलें. आलेला गृहस्थ तोच त्यांचा ड्रायव्हर होता.

मीं म्हटलें, " ओळखलं."

त्यानें शेकहॅण्ड करण्यासाठीं हात पुढें केला आणि म्हटलें,

" बसा, बसा कीं. मी हे कपडे – वर्कशॉपचे – काढून आंघोळ बिंघोळ करून येतों." आणि तो गेला.

त्याचें वागणें मला सभ्य, पण किंचित् थंड वाटलें. नंदिनीच्याही तें लक्षांत आलें असावेंसें वाटते.

ती पुढें बोलूं लागली,

" आतां आम्हीं इथें वर्कशॉप् काढलं आहे. कॉनॉट प्लेस-जवळच. छान बिझिनेस चालतो. लग्न झाल्यावर वॉर सुरू झाली. ह्यांनीं इकडे नोकरी धरली होती. मग हें वर्कशॉप काढलं...

" बरं मी येतें हं आत्तां. बसा जरा."

तो स्नान वगैरे करून परत आला तेव्हां अधिक मोकळे-पणानें आणि उत्साहाने बोलूं लागला. तिनें आंत जाऊन माझ्या वतीनें त्याला कांहीं सांगितलें असावें असें मला वाटतें.

जेवणें वगैरे झाल्यावर निरोप देतांना नंदिनी आणि तिचा नवरा दोघेंही म्हणालीं,

" दिल्लींत असाल तेव्हां जरूर आमच्याकडे येत जा."

" जरूर जरूर..."

ती मला संध्याकाळीं भेटली. त्यानंतर माझ्या मनांत आलेल्या सगळ्या प्रश्नांचीं उत्तरें मला मिळालीं होतीं. तरी पण मला शांत, समाधान झाल्यासारखें वाटत नव्हतें. कांहीं तरी खटकत होतें. मीं मनांत म्हटलें, खरोखरच सगळ्या प्रश्नांचीं उत्तरें मिळालीं होतीं का? 'त्या दिवशीं तुमच्याच मनांत तर कांहीं चलबिचल झाली नव्हती ना?' हा जो अनपेक्षित प्रश्न तिनें विचारला, त्याचें उत्तर कांहीं मला सापडत नव्हतें आणि तेंच मला बोचूं लागलें.

# नैया मोरी मंझधार

“ह्यांनीं नको म्हणतेत तर कशाला जातोस कीं, म्हणते मी माणिकनगराला ? ” पद्मनाभची आई त्याला म्हणाली.

तो अंगांत सदरा आणि जाकीट घालून डोक्याला रुमाल बांधूं लागला होता ! आईचे शब्द ऐकून तसाच थांबला. खरें म्हणजे माणिकनगरला जायची वेळ झाली होती. त्याचा मित्र जयराम गाडी जोडून तयार ठेवून त्याची वाट पाहात बाहेर उभा होता. पण आई पुढें काय म्हणते तें ऐकण्यासाठीं तो थांबला.

“ आणिक हिला जाळ आलंय् – तुळशीला. ” बायकोला ताप आला आहे हें पद्मनाभला ठाऊक होतें, पण त्यासाठीं थांबून घरीं राहायची त्याला जरूर वाटत नव्हती. त्यानें रुमाल बांधून पुरा केला.

त्याचे वडील राघवाचार्य हें बघत होते. आपल्या बायकोला उद्देशून ते म्हणाले,

...५५

" कशाला सांगतेस त्याला तूं हें सगळं? मीं त्याला थोड्या वेळां का सांगितलं आहे? तिकडे त्या जत्रेंत गाणं असेल त्या बकुळीचं कीं फकुळीचं. जाऊं दे त्याला. 'बुद्धिः कर्मानुसारिणी' असं म्हणून सोडून द्यावं झालं."

त्यांचें बोलणें चालू असतांनाच पद्मनाभ पायऱ्या उतरून अंगणांत गेला होता. दाराकडे जातांजातांच तो म्हणाला,

" मी सांगून जातों रामण्णाला औषध पाठवायला."

" तूं जा आपल्या जत्रेला. आम्ही आणूं काय आणायचं तें." त्याचे वडील म्हणाले.

तोंपर्यंत पद्मनाभ दाराबाहेर पडला होता.

पद्मनाभनें आपल्या वडिलांची निराशा केली होती. राघवाचार्य मोठे व्युत्पन्न ब्राह्मण होते. धर्मशास्त्रांत त्यांचा अधिकार फार मोठा मानला जात असे. चिंचोळीसारख्या लहान गांवांत राहात असूनसुद्धा हैदराबादपासून म्हैसूरपर्यंत त्यांची कीर्ति पसरली होती. त्यांच्या माध्वसांप्रदायांत तर त्यांना विशेष मान होता. वर्षांतून एकदा तरी त्यांच्या स्वामींकडून त्यांना आमंत्रण आल्यावांचून राहात नसे. जितका विद्वत्तेबद्दल, तितकाच निःस्पृह आणि निर्मळ आचरणाबद्दलही त्यांचा लौकिक होता.

आपल्यासारखाच आपला मुलगाही विद्वान् आणि लौकिकवान् व्हावा अशी त्यांची इच्छा होती. पद्मनाभ होताही बुद्धिमान्. म्हणून मोठ्या आशेनें राघवाचार्यांनीं आपल्या कल्पनेनुसार त्याचें शिक्षण स्वतः चालवलें होतें. रूपावलि, समासचक्र, अमरकोश आणि नाना प्रकारचीं स्तोत्रें आणि सुभाषितें त्यानें बालवयांतच मुखोद्गत केलीं होतीं. मुंज झाल्यावर यथाक्रम संथा घेणेंही चाललें होतें. पण जसा तो वयांत येत चालला, तसें त्याचें लक्ष वेदाध्ययनावरून उडून काव्यें, नाटकें इकडे लागलें आणि तो शास्त्रग्रंथ वाचण्या-

ऐवजीं अमरुशतक, गीतगोविंद, शृंगार-तिलक ह्यांचीं पारायणें करूं लागला. त्याचा आवाज चांगला होता, त्यांतच त्याला गाण्याचा नाद लागला. सोबतीही तसेच मिळाले आणि वय मोठें होत चाललें तसा इतर व्यासंग सोडून तो गाण्या-बजावण्यांतच दंग झाला. त्या अनुषंगानेंच तो माणिकनगरच्या जत्रेला जाऊं लागला. तेथेंच त्याची आणि बकुळेची ओळख झाली. त्या वेळीं नुकतेंच तिचें नांव लोकांच्या तोंडीं होऊं लागलें होतें. तिचे उमलूं लागलेलें ताजें रूप आणि खुल्या गळ्याचें धारदार गाणें ह्यांचें लोक कौतुक करूं लागले होते. ओळख झाल्यानंतर लवकरच तो तिच्या जवळच्या मंडळी-पैकीं एक झाला. त्यांचा सहवास वाढत चालला आणि त्याबरोबर स्नेहही.

राघवाचार्यांना पद्मनाभाचीं हीं लक्षणें पाहून फार वाईट वाटले. त्यांनीं त्याला चार-दोन वेळां सांगूनही पाहिलें. परंतु अखेर तो वयांत आला आहे हें लक्षांत घेऊन आणि आपलें-त्याचें प्राक्तन समजून त्यांनीं त्याला बोलायचें टाकलें.

लोक आपलें आणि बकुळेचें नांव जोडून बोलतात हें पद्मनाभला माहीत होतें. त्यानें त्याची पर्वा केली नव्हती. आपले वडीलही ह्या गोष्टीचा असा उल्लेख करतील असें मात्र त्याला वाटले नव्हतें. ह्या उल्लेखामुळें त्याला आश्चर्य तर वाटलेंच, थोडेंसें वाईटही वाटलें, पण बरें झालें एकदा उल्लेख होऊन गेला, ओझें उतरलें, असेंही वाटलें.

तो माणिकनगरला पोचला, तेव्हां संध्याकाळ होऊन गेली होती. बकुळेची आणि त्याची भेट झाली तेव्हां ती म्हणाली,

" म्हटलं, येतां कीं नाहीं ? "

" कां ? विशेष काय आहे ? "

" तो नरसिंगराव आला होता पुन्हा, आज संध्याकाळीं ! "

" कोण नरसिंगराव ? "

“ तुम्हांला माहीत नाहीं का ? तो हैदराबादच्या जागिरदार भगवंतरावांचा मुलगा ? आज दोन तीन वर्षं मागें लागला आहे ? ”

“ हां, हां, आला ध्यानांत. काय म्हणत होता ? ”

“ म्हणतो, यंदा मी ऐकणार नाहीं. यंदा तुला आलंच पाहिजे. गेलीं दोन-तीन वर्षं मी आग्रह करतों आहें, तूं ऐकत नाहींस ! ”

“ मग तूं काय सांगितलंस ? ”

“ सांगितलं, रात्रीं पाहूं. ”

मध्यरात्र उलटून पहाटेकडे कलली होती. चाललेलें गाणें बकुळेनें नुकतेंच संपवलें होतें. बाहेर कडाक्याची थंडी होती, पण आंत घुसमट गर्दीमुळें अगदीं गुदमरत होतें. बकुळेच्या तंबूंत नेहमींच गर्दी असे ; कारण माणिकनगरच्या उत्सवांत बकुळेचें गाणें ही एक खास गोष्ट असे. तिचें सुरेल आणि ढंगदार गाणें ऐकण्याकरितां जसे सोलापूर–विजापुरापासून हैदराबादपर्यंतचे श्रीमंत रसिक येत, तसें तिचें कसदार देहाती जोबन, तिचें रेखीव रसरशीत रूप आणि डोळे, भुंवया, व ओठ ह्यांच्या ठेवणींनीं आणि हालचालींनीं गाण्यांतले भाव व्यक्त करण्याचें तिचें कौशल्य ह्यांची डोळे भरून लूट करण्यासाठीं आसपासच्या पांच-पंचवीस कोसांतले शेतकरी–वाणी–उदमीही तिच्या तंबूंत खेचाखेच करीत. आतांच संपलेल्या ‘ हाथोंमें मेंदी लगी ’ ह्या गाण्यांत तिनें आपल्या हावभावांनीं जो रंग भरला होता, त्यानें सगळा तंबू बेभान झाला होता ; तो गाणें थांबल्यावरच परत भानावर आला.

पांच सहा मिनिटें तशींच गेलीं. आपलें अवघडलेलें अंग मोकळें करण्यासाठीं बकुळेनें ताठ होऊन, खांदे मागें ओढून, पाठीला किंचित् बांक दिला, पदर सावरून मांडी नीट केली, तंबोरा उचलून घेतला आणि जवळच डाव्या बाजूला बसलेल्या नरसिंगरावकडे पाहात विचारलें,

" काय म्हणूं ? "

पण त्याचें लक्ष तिच्या बोलण्याकडे नव्हतें. एका क्षणापूर्वीच्या तिच्या थोड्याशा हालचालींतून, तिच्या शरीराचा जो लवचिक, गोंडस डौलदारपणा दिसून आला होता, तिथेंच त्याचें लक्ष अजून रेंगाळत होतें. शिवाय गाण्याच्या आधीं संध्याकाळीं बकुळेशीं त्याचे जें बोलणें झालें होतें, त्यामुळेंही तो थोडासा व्यग्र झालेला होता. त्याच्याकडून कांहीं उत्तर आलें नाहीं.

" कांहींही म्हणा तुम्हांला वाटेल तें ! " कोणीतरी म्हणालें.

" ' कंकर मार जगायो ' म्हणा. " दुसरीकडून एक आवाज आला.

" ' ऐसा मदन बिच्छू डसा ' म्हणा. " कोपऱ्यांतून कोणी तरी ओरडलें.

बकुळेला हसूं आलें, तेव्हां नरसिंगरावचें तिच्याकडे लक्ष गेलें. तिनें कांहीं तरी विचारल्याचेंही त्याला आठवलें. तो म्हणाला, " कहो कुछ भी. "

" ' नैय्या मोरी मंझधार ' म्हणूं ? "

तिनें पद्मनाभकडे पाहात विचारलें. त्यानें खुणेनेंच होय म्हटलें.

तें तिचें अतिशय आवडतें गाणें होतें. त्यांतून ती इतकी कांहीं विलक्षण आर्तता आणि असहायता व्यक्त करी कीं श्रोत्यांचीं अंतःकरणें पिळवटून जात. तिनें तंबोऱ्यावरून बोटें फिरवलीं आणि स्वर ओढला. त्याबरोबर सगळा तंबू स्तब्ध झाला. नरसिंगरावही परत आपल्या विचारांत गर्क झाला.

गाणें संपलें तेव्हां तो भानावर आला. तंबू रिकामा होऊं लागला होता. हळुहळू गर्दी ओसरली. मधल्या जागेंतली निवडक शेठ-सावकार मंडळीच काय ती राहिली. कांहीं वेळानें त्यांनींही एकामागून एक निरोप घेतला.

अखेर बकुळा आणि तिच्या बरोबरचीं माणसें तेवढींच काय तीं तंबूंत राहिलीं. नरसिंगराव जरा पुढें सरकून बकुळेकडे पाहात म्हणाला,

" मग काय बकुळी ? काय बेत ठरला ? मीं तुझ्यासाठीं स्वतंत्र जागा शालीबंड्यावर पाहून ठेवली आहे. तुझा सगळा खर्च मी करीन आणि वरतीं तुला माहवार पन्नास रुपये देईन." ती कांहीं बोलत नाहींसें पाहून पुढें म्हणाला, "पाऊणशें देईन. झालं ? आतां तरी विश्वास आहे कीं नाहीं ?"

" पैशाचा आणि विश्वासाचा प्रश्न नाहीं हुजूर. माझी हैसियत ती काय ? मी आपल्या पायाची जूती आहे. आपण लागेल तेव्हां ठोकरून दूर करूं शकतां."

" मग काय वांधा आहे ?"

त्यानें समोर बसलेल्या पद्मनाभकडे पाहिलें. पण त्याच्या चेहेऱ्यावर कांहीं भाव दिसला नाहीं.

" वांधा कसला आला आहे ! पण पुढच्या वर्षीं पाहूं. यंदा राहूं द्या." बकुळा म्हणाली.

" हें ठीक नाहीं, बकुळा. मी गेलीं दोन–तीन वर्षं तुला आग्रह करतों आहे..."

" सरकार, हैदराबादेंत इतक्या एकीहून एक वरचढ कंचन्या आहेत, त्यांना सोडून माझ्यासारख्या..."

" उनकी बात छोडो. हैदराबादच्या कंचन्या सगळ्या सपक आणि शिळ्या आहेत. मला तुझा जबाब पाहिजे."

" पुढच्या वर्षीं..."

" बकुळा..." त्यानें पुन्हा पद्मनाभकडे पाहून म्हटलें. पण तेवढ्यांत बकुळा म्हणाली,

" सरकार, खरं सांगूं ? मला शहरांची भीति वाटते. मागें एकदा मी सोलापुरला गेलें होतें, पण चार दिवसांत जीव कंटाळला. काय ते रस्ते, काय गाड्या-घोड्यांची वर्दळ, काय ती धूळ आणि घाण ! मी परत घरीं आलें तेव्हांच मला बरं

वाटलं. तेव्हांपासून मला आपलं गांव सोडून कुठेंही जावंसं वाटत नाहीं. हें माझं खरं कारण आहे. ”

“ अच्छा, मर्जी तुझी. ” नरसिंगराव थोडासा चिडून म्हणाला, “ मला वाटलं नव्हतं तूं इतकी जिद्दी असशील. देखा जायगा. ”

एवढें बोलून तो लागलीच तंबूबाहेर पडला.

दुसऱ्या दिवशीं पहाटेपूर्वींची वेळ होती. बकुळा, तिची आई, पद्मनाभ आणि जयराम अशीं गाडींतून बकुळेच्या गांवाकडे चाललीं होतीं. पहाट व्हायला आली होती. पण अद्याप शें-पन्नास पावलांपलीकडे नीटसें दिसत नव्हतें. झुडपांतून भुसकन् बाहेर पडून एखादा ससा गाडीपुढून आडवा जाई किंवा एखादा वानरांचा कळप ह्या झाडावरून त्या झाडावर गेला म्हणजे झाडा-पानांची सरसर फडफड होई, तेवढी हालचाल जाणवे. रस्ता जंगलांतून गेला होता. एका बाजूला डोंगरांची रांग आणि दुसऱ्या बाजूला पुरुषभर खालीं नदीचें पात्र होतें. बैलांच्या घुंगरांच्या नादांत खडखडत गाडी चालली होती. त्यांचें गांव सरासरी दोन तीन कोसांवर राहिलेलें होतें. पुढल्या गाड्या पुढें निघून गेल्या होत्या. मागें देखील लांबवर कोठें गाडी दिसत नव्हती.

बकुळा नुकतीच उठून बसली होती. पद्मनाभ वगैरेही आळीपाळीनें झोपून जागे झालेले होते. बकुळेच्या आईची इच्छा तिनें नरसिंगरावबरोबर जावें अशी होती आणि तेंच तिच्या मनांत घोळत असावें. कारण बकुळा उठून बसते न बसते तोंच ती म्हणाली,

“ तूं ‘ हो ’ म्हणायला पाहिजे होतंस त्याला; एवढा मोठा मनुष्य विचारतो. ”

आईचा विचार बकुळेलाही माहीत होता. पद्मनाभचा आणि आपला स्नेहसंबंध तिला अव्यवहारी वाटतो हेंही तिला ठाऊक होतें. तें लक्षांत घेऊन तिनें उत्तर दिलें,

" पण मीं पुढल्या वर्षी पाहूं म्हटलं ना ? "

" पण 'हो' थोडंच म्हटलं आहेस ? अशी तर गेलीं दोन-तीन वर्षं आशा लावली आहेस. वेळींच आपलं नीट झालं तें बरं."

बकुळा पद्मनाभकडे वळून म्हणाली,

" तुम्ही नाहीं बोलत ? "

पद्मनाभ क्षणभर गप्प राहिला. मग म्हणाला,

" कां नाहीं गेलीस तूं त्याच्याबरोबर ? "

" तुम्हांला काय वाटतं ! मी कां गेलें नाहीं ? "

" मला काय ठाऊक ? तुझं दुसऱ्या कुणावर प्रेम असेल!"

" कलावंतीण कुणावर प्रीति करत नसते. माहीत नाहीं का तुम्हांला ? " ती आईला ऐकूं जाणार नाहीं अशा बेतानें त्याच्या कानाशीं कुजबुजत म्हणाली आणि हसली.

तिच्या बोलण्याचा रोख त्याला कळला, पण तो बळेंच म्हणाला,

" नाहीं माहीत. तुलाच तें जास्त चांगलं माहीत असेल. "

" बरं, नाहीं माहीत तर नाहीं. नाहीं गेलें, झालं. मला नाहीं जावंसं वाटलं. बस्स ? "

एवढें बकुळा म्हणते आहे तोंच दोन तीन इसम दरड चढून आले आणि त्यांच्या गाडीवर चढले. एकाने गाडीवाल्याला मागें रेटून दोऱ्या आपल्या हातीं घेतल्या आणि तो गाडीचें तोंड मागें फिरवूं लागला.

" कौन है ? क्या है यह गडबड ? "

असें दरडावून विचारून पद्मनाभ पुढें झाला आणि त्यानें बैलांच्या कासरा परत आपल्या हातांत घेतल्या. तोंच मागून कोणींतरी त्याचा हात ओढला आणि सोट्याचा एक फटका त्याच्या डोक्यांत बसला. जयरामला दुसऱ्या एकानें खालीं ओढलें होतें. गाडींत आणि बाहेर झोंबाझोंबी आणि मारामारी सुरू झाली. बकुळा आणि तिची आई ह्यांनीं आरडाओरड सुरू केली, पण आसपास बऱ्याच अंतरापर्यंत

कोणीच नसल्यानें कांहीं उपयोग झाला नाहीं. बऱ्याच झटापटीनंतर पद्मनाभनें आणि त्याच्या सोबत्यांनीं त्या लोकांना मारून दरडीखालीं पिटाळून लावले आणि गाडी परत आपल्या रस्त्याला वळवली.

" नरसिंगरावचेच्च लोक असावेत. कुणी लुटारू नव्हत, नाहीं ? " जयराम म्हणाला.

" मलाही असंच वाटतं. पण तो इतक्या लवकर असं करील असं नव्हतं मला वाटलं. " पद्मनाभ म्हणाला, " त्याचं खरंच तुझ्यावर प्रेम दिसतंय्. "

असें म्हणून त्यानें बकुळेकडे पाहिले. पण ती कांहीं बोलली नाहीं.

पद्मनाभला चांगलेंच लागलें होतें. जखमेंतून सारखे रक्त वाहात होते. त्यामुळें त्याला अतिशय ग्लानि आली. गाडी बकुळेच्या घरीं पोचेतों त्याची अगदीं असहाय स्थिति झाली होती. त्याला तिथून गांवीं जाणें त्या स्थितींत अशक्यच होतें.

जखम बरीच खोल होती. ती भरून चांगली बरी होऊन पद्मनाभला हिंडतें फिरतें व्हायला जवळ जवळ दीड-दोन महिने लागले. सगळ्या आजारांत तो बकुळेकडेच होता. तिनें त्याला दुसरीकडे कोठेंही नेऊं दिलें नाहीं.

राघवाचार्यांना पद्मनाभच्या अपघाताची आणि आजाराची हकीकत कळली, तेव्हां ते म्हणाले,

" हें केव्हां तरी व्हायचंच होतं. कांट्यांत शिरल्यावर ओरखडे निघाल्यावांचून कसे राहातील ? आपल्या कर्माचं फळ तो भोगतो आहे. मला त्याच्याशीं कर्तव्य नाहीं. "

त्याच्या आईनें त्याला जयराममार्फत घरीं बोलावू पाठवलें. पण एक तर तो जाण्यासारख्या स्थितींत नव्हता आणि शिवाय जायला उत्सुकही नव्हता. तो म्हणाला,

" घरीं जास्त काय आहे ? इथें ही बकुळा करते आहे माझं सगळं. आईला वाटत असेल मला भेटावंसं. पण मला तिथें बाबांमुळें अगदीं अवघड होईल. त्यापेक्षां इथेंच बरा आहें मी. "

" आणि मीसुद्धा त्यांना अशा स्थितींत कुठें नेऊं देणार नाहीं. " बकुळा म्हणाली.

" तुझी बायको ? ती इथें कशी येणार ? " जयरामनें विचारलें.

" तिला वाटलं तर येऊं दे ! येणार आहे का ? "

एका कसबिणीच्या घरीं जायचें ह्या विचारानें तुळशीला कसेंसेंच वाटत होते. पण किती झाले तरी आपण त्याच्यासाठीं कांहीं तरी केलें पाहिजे ह्याची तिला जाणीव होती. शिवाय पद्मनाभ जरी गाण्याबजावण्याच्या छंदामुळें तिला पाठमोरा झाला होता, तरी आपण सेवा करून त्याला आपल्याकडे वळवूं शकूं अशी तिला आशा वाटत होती. म्हणून तिनें एकदा दबकत प्रश्न काढला. पण राघवाचार्यांनीं साफ नकार दिला आणि ती गेली नाहीं.

पद्मनाभ नुकताच हिंडूं फिरूं लागला होता. एकदा बकुळा आणि तो ओसरीवर बोलत बसलीं होतीं. तो म्हणाला,

" बकुळा, मला वाटतं, तूं इथून दुसरीकडे जावंस. कारण आज ना उद्या पुन्हा नरसिंगराव धाड आणल्याशिवाय राहाणार नाहीं. "

" कुठें जायचं ? "

" कुठेंही. तुझ्याजवळ चांगली कला आहे. तुला कमी पडणार नाहीं. "

" मी नाहीं जाणार. मी एकटी कशी जाऊं ? मला जशी भीति आहे, तशी तुम्हांलाही नाहीं का ? तुमच्यामुळेंच मी त्याच्याकडे जात नाहीं, ही त्याची खात्री झाली आहे. "

" माझं मी पाहून घेईन. तूं इथें नसलीस म्हणजे मला कांहीं काळजी नाहीं."

" पण मला आहे. तुम्ही येत असलां तर मी जाईन. नाहीं तर इथेंच काय व्हायचं असेल तें होईल."

तिची आई आंतून बोलणें ऐकत होती. ती बाहेर येत म्हणाली,

" तूं नरसिंगरावला ' हो ' कां म्हणत नाहींस? म्हणजे सगळीच काळजी मिटली."

" मी जीव देईन त्यापेक्षां."

आई गप्प झाली त्या वेळीं बोलणें तितकेंच राहिलें. पण त्यावर पुन्हा दोन-तीन वेळां तोच विषय निघाला. अखेर पद्मनाभ म्हणाला,

" बरं. चला, सगळींच जाऊं."

* * *

आणि तिथून त्यांच्या प्रवासी जीवनाला प्रारंभ झाला. पहिल्यानें तीं सोलापूरला गेलीं. कारण गुलबर्गा सोडल्यावर पहिलें मोठें शहर सोलापूरच. शिवाय ती पूर्वी सोलापूरला गेलेली होती आणि तिचें नांव तेथें ठाऊक होतें.

त्यांनीं दोन-तीन महिने सोलापुरांत काढले. थिएटरांत आणि खाजगी रीतीनें तिच्या गाण्याच्या पुष्कळ बैठकी झाल्या. तिला चांगला पैसा मिळाला. तिथून ती मंडळी पुढें पुणें, सातारा, कोल्हापूर, बेळगांव, सावंतवाडी अशी हिंडत हिंडत मुंबईला गेली. मुंबईत चार पांच महिन्यांचा मुक्काम करून नाशकाला गेली. नाशकाहून खानदेशांत, खानदेशांतून वऱ्हाडांत, तेथून पुढें नागपूरला असा त्यांचा दौरा चालत राहिला. त्यांना चांगले पैसे मिळत गेले. पद्मनाभ तिला नवीन गाणीं करून देई, नवीन चाली बसवून घेई, तिच्या तालमी घेई, तिच्या प्रवासाची सगळी व्यवस्था पाही. नवीन धाडसाच्या नव्या जोमांत त्यांचे दिवस भराभर चालले होते.

...६५

हळुहळू बकुळेची प्रतिष्ठा वाढत चालली. तंबू-थिएटरांतून गाण्याचे दिवस मागें पडले. बडोद, इंदूर, धार, देवास, ग्वालेर अशा महाराष्ट्राबाहेरच्या मराठी शहरांतून आणि लहान मोठ्या संस्थानांतून तिला बोलावणीं येऊं लागलीं. कोणाचा वाढदिवस, कोणाचें राज्यारोहण, कोणाचा विवाहोत्सव, कोणाचा जन्मोत्सव अशा निमित्तांनीं तिच्या बैठकी होऊं लागल्या. अनुकूल वाऱ्यावर सरसरून वर जाणाऱ्या पतंगासारखें तिचें जीवन सरारत चाललें होतें.

अशा भरभराटींत पांच—सात वर्षें गेलीं.

बकुळेची वावडी वरवर चढत होती, परंतु हळुहळू पद्मनाभला त्यांत रस वाटेनासा झाला. बकुळेची प्रतिष्ठा आणि कीर्ति जशी वाढत चालली, तशीं तिला मोठमोठ्या शेट-सावकारांकडून, सरदार-जहागिरदारांकडून आपल्याजवळ राहाण्याबद्दल आमंत्रणें येऊं लागलीं. तीं सगळीं आमंत्रणें ती नाकारीत असे, ही गोष्ट त्याला अभिमान वाटावा अशीच होती. त्यांत त्याला आनंदच वाटायला हवा होता आणि वाटतही होता. पण त्या बरोबरच त्याला अस्वस्थ वाटत होतें. प्रवासी जीवनाला आरंभ केल्यानंतर पहिले कांहीं दिवस धडाडींत आणि धडपडींत गेले. त्यांत बकुळेच्या बरोबरीनें त्याचा भाग होता. पण पुढें जसें तिचें जीवन मार्गाला लागलें, तिची प्रतिष्ठा वाढली, तसें त्याला विशेष कांहीं करायला राहिलें नाहीं. ती कितीही वर गेली तरी तिची दोरी आपल्या हातीं ठेवावी आणि ती मधून मधून मागें खेचावी ही व्यापारी वृत्ति त्याच्याजवळ नव्हती. त्याच्या जीवनाला एक प्रकारची निष्क्रियता येत चालली. त्यांत त्याला एक प्रकारचा गौणपणा वाटूं लागला. त्याच्या मनाला बोचणी लागून तो हळुहळू उदास बनत चालला आणि ही गोष्ट बकुळेलाही जाणवल्यावांचून राहिली नाहीं.

रात्रीं जेवणें झाल्यावर थोडावेळ तरी बोलत बसायचें अशी त्यांची सवय असे. एक दिवस रात्रीं पद्मनाभ एकटाच बाहेर जाऊन बसला. थोड्या वेळानें बकुळाही येऊन त्याच्या जवळच बसली. बराच वेळ गेला. त्यानें तिच्याकडे वळून पाहिलें नाहीं कीं तिच्याशीं तो कांहीं बोलला नाहीं.

तिला ती स्तब्धता फार वेळ सहन होईना. ती त्याला म्हणाली,

" बोलत नाहीं ? "

" कांहीं नाहीं. असंच. "

" नाहीं कसं ? मी पाहातेंय्. तुम्ही हल्लीं उदास असतां. नीट बोलत नाहीं, कांहीं नाहीं. "

" कांहीं नाहीं. उगीच तुला वाटतं. "

" तुम्ही नाहीं म्हणा, पण तुमचा आवाजच सांगतो आहे. तुमचं मन कांहीं स्वस्थ नाहीं. तुम्ही कांहींतरी लपवतांहां माझ्यापासून. माझं कांहीं चुकलं का ?

" तुझं काय चुकायचं, बकुळा ? मला कांहीं झालेलं नाहीं. नाहीं एखादे वेळीं बोलावंसं वाटत. एवढंच. "

" पण असं आतांपर्यंत नव्हतं झालं कधीं. घरीं जावंसं वाटतं का ? खरंच, उगीच मीं तुम्हांला माझ्या बरोबर यायला लावलं. "

" नाहीं बकुळा, मला घरीं नाहीं जावंसं वाटत—घराची आठवण होत नाहीं असं नाहीं. पण ओढ नाहीं त्याची. तसं नसतं तर मी ... "

" मग माझा कंटाळा आला का ? "

" तुझा कशानें कंटाळा येईल ? "

" मग असे तुटक तुटक कां असतां तुम्ही ? एकटेच कुठें तरी विचार करीत बसतां. "

" बकुळा, मला तुझा किंवा दुसऱ्या कुणाचा नाहीं कंटाळा आला. पण माझा मलाच कंटाळा येत चालला आहे असं

वाटतं. माझा कुणाला कांहीं उपयोग नाहीं, मी कांहीं उद्योग करीत नाहीं, असं कांहीं तरी वाटतं. उगीच आपले दिवसामागून दिवस चालले आहेत..."

"चला, कांहीं तरी बोलूं नका. म्हणे माझा कांहीं उपयोग नाहीं. तुम्ही नसतां, तर माझं सगळं कुणीं केलं असतं? कुणामुळें चाललंयू हें सगळं? माझी वावडी उंच चढली आहे पण तिचा दोरा तुम्ही आहां. उगीच वेड्यासारखं कांहीं तरी मनांत आणायचं ..."

तिनें त्याचा हात आपल्या हातांत घेतला आणि त्याला उठवीत ती म्हणाली,

"उठा, रात्र बरीच झाली. उगीच कांहीं तरी विचार करूं नका."

ती वेळ गेली खरी, पण त्याच्या मनावरचें दडपण कांहीं कमी झालें नाहीं. उलट त्याला वाटूं लागलें कीं अशाच मनस्थितींत आपण बकुळेबरोबर राहिलों तर त्यांत दोघांचेंही जीवन कष्टी होईल. त्यापेक्षां आपण जावें हें बरें. ती कुठेंही एकटी किंवा कुणाजवळ राहूं शकेल.

चारसहा महिन्यांनीं त्याला तशी संधिही मिळाली. त्यांचा मुक्काम त्या वेळीं मुंबईला होता.

तिसऱ्या प्रहरची वेळ होती. दुपारची वामकुक्षी घेऊन पद्मनाभ नुकताच उठला होता. तेवढ्यांत बकुळा त्याच्याजवळ येऊन बसली.

"आज संध्याकाळीं येणार आहेत शेठजी, जबाब मागायला."

"मग काय सांगणार आहेस तूं त्यांना?"

"जसं तुम्हांला ठाऊकच नाहीं! वेगळं काय सांगायचं?"

"बकुळा..."

तिनें त्याच्याकडे पाहिलें. त्याचा स्वर तिला कांहीं वेगळाच – किंचित् गंभीर आणि कांपरा वाटला.

“ तूं त्याला सांग ‘ हो ’ म्हणून. ”

त्यानें चपराक मारली असती, तरी तिला एवढा धक्का बसला नसता. ती त्याच्याकडे पाहातच राहिली कांहीं क्षण.

“ काय सांगतां तुम्ही मला ? तुम्हांला इतका का कंटाळा आला आहे माझा ? मला नव्हतं वाटलं. मागलं आपलं बोलणं झालं, त्यावर तुमच्या मनांत कांहीं राहिलं नसेल असं मला वाटलं होतं. माझंच कांहीं तरी चुकलं. तुम्ही मला सांगत नाहीं. नाहींतर असं कसं बोललां असतां ? ”

“ तुझं कांहीं चुकत नाहीं बकुळा. मलाच समजत नाहीं मीं काय करावं. आपण अशींच बरोबर राहिलों तर कुणालाच सुख लागायचं नाहीं, अशी भीति वाटतेय् मला. . . ”

“ माझं राहूं द्या. तुम्हांला माझ्यामुळें सुख लागत नाहीं, हेंच त्यांतलं खरं. ”

“ असं नाहीं. . . ”

“ नका बोलूं. कलावंतिणीनें कुणावर प्रेम करूं नये हेंच खरं. धारेंत नाव सोडावी तसं तुम्ही मला सोडून जायला तयार झालांत. पण माझा विचार केलात का ? नरसिंगरावनें मला विचारलं होतं, तेव्हां माझी काय योग्यता होती ? पण मीं त्याला ‘ नाहीं ’ म्हटलं. कां ? ”

“ तुला पस्तावा होतो का ? ”

“ मुळींच नाहीं. तुमचा काय माझ्यावर जोर थोडाच होता ? मीं आपण होऊन त्याला ‘ नाहीं ’ म्हटलं; काय आपल्याला कमी पडलं ? . . . आणि आतां तुम्ही. . . ”

तिचा गळा भरून आला. डोळ्यांत आंसवें तरळूं लागलीं. तिनें पदर डोळ्यांकडे नेला.

“ बकुळा. . . ”

तिला जवळ ओढण्यासाठीं पद्मनाभनें तिचा हात आपल्या हातीं घेतला. पण तो सोडवीत ती म्हणाली,

“ चला, बोलूं नका. ” आणि डोळे पुशीत ती निघून गेली.

. . .६९

संध्याकाळीं शेठजी आले. बकुळेनें नेहमींप्रमाणेंच नम्र पण स्पष्ट शब्दांत त्यांना नकार दिला.

रात्रीं जेवणें झाल्यावर रोजच्यासारख्याच पद्मनाभ आणि बकुळा ह्यांच्या गप्पा झाल्या. तिसऱ्या प्रहरच्या बोलण्यांतला विषय निघालाही नाहीं. तिला वाटलें, वावटळ आली आणि गेली.

सकाळीं उठून ती पाहाते, तों पद्मनाभ गेलेला होता !

* * *

पद्मनाभ मुंबईहून निघाला, तो थेट हरिद्वारला गेला. तिथें महिना दोन महिने राहून पुढें त्यानें बदरीनाथ, केदारनाथ, गंगोत्री, जम्नोत्री, कैलास, मानस सरोवरापर्यंतची यात्रा केली. परत आल्यावर हृषीकेशहून त्यानें जयरामला एक पत्र लिहिलें. त्यांत त्यानें बकुळेला सोडीपर्यंतची हकीकत लिहिली होती आणि म्हटलें होतें,

"...मनाच्या तशा स्थितींत तिच्याबरोबर राहिलों असतों तर तिला जास्त मनस्ताप झाला असता कीं, मीं तिला सोडल्यामुळें जास्त मनस्ताप झाला हें सांगणें कठीण आहे, मी संदेहांत पडलों होतों. त्या वेळीं माझ्या अंतःकरणप्रवृत्ती-नुसार वागलों एवढें खरें. मी तेथून घरीं कां आलों नाहीं, असा प्रश्न येईल. परंतु ज्यानें बकुळेबरोबर निघतांना घराचा विचार केला नाहीं आणि इतकीं वर्षें घराची विचार-पूस न करतां काढलीं, त्यानें तिला सोडून परत घरीं जाण्यांत काय अर्थ ! मी कांहीं बकुळेशीं भांडलों नव्हतों कीं तिला कंटाळलों नव्हतों. मला माझाच कंटाळा आला होता..."

हिमालयाची यात्रा संपल्यावर देखील पद्मनाभ उत्तर हिंदुस्थानांतच हिंडत राहिला. हरिद्वारहून पंजाबांत, पंजाबांतून काश्मिरांत, काश्मिराहून बनारस–अलाहाबादला, तेथून कलकत्त्याला अशी त्याची अखंड यात्रा चालली होती.

त्याची यात्रा चालली होती तसें वयही चाललें होतें. होतां होतां त्याची चाळिशी उलटून गेली. माणिकनगरची जत्रा, शेवटच्या रात्रींचें शेवटचें गाणें, नरसिंगरावनें बकुळेला केलेला आग्रह, गाडींतून गांवाकडे जात असतांनाचा तो मारामारीचा प्रसंग, त्याचा आजार, त्यांत दिसून आलेली बकुळेची आपल्याबद्दलची विशेष आपलीक, त्यानंतरचें प्रवासजीवन, मुंबईतला तो अखेरचा तिसरा प्रहर, ह्यांच्या आठवणी मागें पडत चालल्या; प्रवासांत मागें पडलेल्या टापूंतल्या ठळक ठिकाणांप्रमाणेंच काय त्या आतां त्या उठून दिसत होत्या. त्यांतच कुठें तरी त्याचें गांव, त्यांतलें त्याचें घर, त्याचे करारी वडील, प्रेमळ आणि गरीब स्वभावाची आई, आणि जिच्याकडे त्याने फारसें कधीं लक्ष दिलें नव्हतें, ती त्याची बायको आणि त्याचीं दोन मुलें हींही होतीं.

हीं सारीं मागें मागें पडत होतीं आणि त्याचा प्रवास चालला होता.

द्वारकेपासून जगन्नाथच्या पुरीपर्यंत आणि अमरनाथापासून कालीघाटापर्यंत सगळ्या यात्रा करून झाल्या. नंतर पद्मनाभ आतां दक्षिणेच्या यात्रेला आला होता. नाशिकहून त्रिंबकला चालला होता.

बस अद्याप भरायची होती. गाडींत तो आणि इतर पांचसात उतारू बसले होते. बाहेर भिकारणींचा घोळका जमला होता. एकीनें सुरुवात केली...

"नैय्या मोरी मंझधार"

त्या स्वरांतल्या आर्ततेनें पद्मनाभच्या काळजाचा वेध घेतला. खोल कुठें तरी बुजल्यासारखी वाटणारी आठवण जागी झाली, बोचूं लागली. थेट बकुळेची लकब. गाणें चाललें होतें —

"काहे तजत हो बीच भँवर मुझ
ना इस ना उस पार
नैय्या मोरी मंझधार..."

पद्मनाभनें खिशांत हात घातला. आठ आण्यांचें नाणें हातांत आलें, तें त्यानें गाणारणीच्या हातावर टाकलें आणि बसमधून उतरून तो चालूं लागला.

" अहो आतां गाडी सुटेल. चाललां कुठें ? "

" सुटूं द्या. सुटूं द्या. मला जायचं नाहीं त्रिंबकला. "

" जायचं न्हाई ? आन् तिकट घेतलंय् तें ! "

" हें तिकीट. " त्यानें तिकीट खिशांतून काढून वाऱ्यावर सोडून दिलें !

इतर उतारू आश्चर्याच्या नजरेनें त्याच्याकडे पाहात राहिले.

तो निघाला, तो थेट माणिकनगरला गेला. तिथें कशाला जायचें ? तिथें कोण असेल-नसेल ह्याचा त्याच्या मनांत विचार देखील नव्हता. चकव्यानें भुलावणी घातलेल्या माणसाप्रमाणें विवश होऊन तो चालला होता.

उत्सवांतली शेवटची रात्र होती. मध्यरात्र उलटून गेली होती. थंडी कडकच पडली होती. पद्मनाभ थेट बकुळेचा तंबू असे त्या ठिकाणीं गेला. तंबूंतली दाटी आंत न मावून बाहेर ओसंडून आली होती. आंतून स्वर येत होते,

" नैय्या मोरी मंझधार... "

अगदीं बकुळेचीच लकब. पण आवाज बकुळेचा नव्हता.

त्यानें जवळच्याच एका इसमाला विचारलें,

" कोण गातंय् ? "

" ठाऊक नाहीं ? नवीनच दिसतां ? चंद्रा. "

" चंद्रा ? बकुळेचा तंबू कोणता ? "

" बकुळा ? कोण बकुळा ? "

हें त्यांचें बोलणें चाललें आहे, तों शेजारचा दुसरा एक इसम त्यांच्याकडे वळला आणि पद्मनाभकडे पाहून म्हणाला,

" पद्मनाभ ? "

" जयराम ? " एक क्षण थबकून पद्मनाभनें विचारलें.

" अरे कुणीकडे ? किती वर्षांनीं ? केव्हां आलास ? "

" हा आतांच. बकुळेचा तंबू कुठें आहे ? "

" तिकडे माझ्या खोलीवर चल. अरे कांहीं पत्रगित्र धाडावं कीं ? "

" खोलीवर नको, तिकडे नदीवर चल. तिथेंच बसूं. "

जत्रेकडे पाठ फिरवून ते नदीकडे चालले आणि नदीकांठीं पोचल्यावर तिथल्या एका खडकावर बसले.

मागच्या बाजूनें लांबून जत्रेंतल्या नाचगाण्याचा, नाटका-तमाशांचा, त्या मानवी जीवनप्रवाहाचा विचित्र अर्थहीन स्वरकल्लोळ कानांवर येत होता. उजव्या बाजूला सांडव्यावरून खालीं पडणाऱ्या पाण्याचा स्स्-श् असा आवाज अव्याहत चालला होता. समोरच खालच्या बाजूला दोनचार हातांवर नदीचा प्रवाह खळखळत होता. त्यांत आकाशाचें प्रतिबिंब वळवळत होतें. प्रवाहाच्या पलीकडे लांबपर्यंत धूसर वाळवंट पसरलें होतें. त्याच्याही पलीकडे करड्या आकाशाच्या पृष्ठभागावर, झाडाझुडपांच्या छाया काळ्या शाईनें सारवल्या-सारख्या दिसत होत्या. एक प्रकारची उदास, स्तब्ध शांतता पसरली होती.

" बकुळा कुठें आहे ? " पद्मनाभनें विचारलें.

" गांवींच असते ती. तूं तिला सोडून गेल्यावर ती घरीं आली. तेव्हांपासून घराबाहेर जात नाहीं फारशी. तुझं पत्र वाचून दाखवलं मीं तिला. डोळ्यांना पाणी आणलं बघ. म्हणाली, 'कुणीं सांगितली होती ही वणवण ? घरीं चल म्हणाले असते, तर घरीं नसतें आलें मी ?' आतां जाणार आहेस का तिच्याकडे ?... "

पायांशीं पडलेल्या छोट्या मोठ्या गोट्यांशीं चाळा करीत पद्मनाभ ऐकत होता. शेजारींच प्रवाहापासून अलग असें एक डबकें झालें होतें. एक गोटा पायाच्या बोटांनींच उचलून त्यानें डबक्यांत टाकला. एक करडें निळसर कडें पाण्यावर

उठलें. त्याच्या आंत दुसरें, तिसरें, चौथें. कडीं क्षीण होत गेलीं. दिसेनाशीं झालीं. पाणी पुन्हा स्थिरावलें.

तो जरा वेळ तसाच पाण्याकडे पाहात थांबला. नंतर जयरामच्या प्रश्नाला उत्तर न देतांच त्यानें विचारलें,

" ही चंद्रा कोण ? "

" कुणी सोलापुराकडली आहे म्हणे. "

" बकुळेची लकब चांगलीच उचलली आहे. बाकी कुणीं उचलली नाहीं म्हणा ! "

तो प्रवाहाकडे पाहात राहिला. मागून लांबून तो जनसंमर्दाचा विचित्र अर्थहीन स्वरकल्लोळ कानांवर पडत होता. सांडव्यावरून पडणारें पाणी अव्याहत सुस्कारत होतें, प्रवाह खळाळत चालला होता.

" तुझ्या घरीं... "

पद्मनाभनें मान उचलून जयरामकडे पाहिलें.

" ...राघवाचार्य गेले. तुझी आईसुद्धा त्यांच्यामागून दोन वर्षांनीं गेली. सात आठ वर्षे झालीं असतील. तुझ्या लेकीला गुलबर्ग्याला दिली आहे, कमळापूरवाल्यांकडे. तुळसावहिनी तिथेंच राहिली आहे शेजारीं खोली घेऊन. चिंचोळीच्या घराला कुलूपच आहे... "

पद्मनाभ प्रवाहाकडेच पाहात राहिला. प्रवाह खळखळत चालला होता, सांडव्यावरून पडणारें पाणी स्स्श्श् करीत होतें, मागून लांबून तो विचित्र अर्थहीन स्वरकल्लोळ कानांवर येत होता...

त्यांचें बोलणें होतां होतां आकाश उजळलें. झाडाझुडपांचे रंग परत येऊं लागले. घरट्यांतले पक्षी किलबिल करूं लागले. नदीच्या प्रवाहावर वाफांचीं नागमोडी वळणें सरपटूं लागलीं.

पद्मनाभ उठून उभा राहिला. त्यानें परत एकदा प्रवाहाकडे पाहिलें. शेजारच्या डबक्याकडे त्याची दृष्टि गेली. एक उसासा टाकला आणि तो चालायला लागला.

“ कुठें चाललास ? ”

“ कुठें ? कुठें नाहीं . . . बरं. येतों मी. ” एवढेंच बोलून पद्मनाभ निघाला आणि सांडव्यावरून पलीकडे जाऊन दिसेनासा झाला.

त्यानंतर जयरामची आणि बकुळेची भेट झाली. तेव्हां त्यानें विचारलें,

“ पद्मनाभ आला होता ? ”

तिनें प्रश्नार्थक दृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें.

“ माणिकनगरला आला होता शेवटल्या रात्रीं. तुला विचारीत होता. ”

“ इथें तर आले नाहींत. ” एवढेंच बोलून तिनें उसासा टाकला.

गुलबर्ग्यांत कोणी तरी पद्मनाभच्या बायकोजवळ म्हणालें,

“ पद्मनाभ आला होता म्हणे. जयरामला भेटला होता माणिकनगरांत. ”

तुळशीने डोक्यावरला पदर पुढें ओढला आणि मान खालीं घातली.

# वं च ना

शाळेच्या दोन्ही घंटा झाल्यावर पांच-एक मिनिटांनीं नलिनीबाईंनीं एकदा सगळ्या वर्गांवरून फेरी मारली. नंतर त्या शाळेच्या समोरच्या व्हरांड्यांत थोडा वेळ उभ्या राहिल्या. अंगणांत शेवंती, झिनिया, डेलिया, वगैरे फुलझाडांच्या कुंड्या वेगवेगळ्या आकृति करून रचून ठेवल्या होत्या. त्यांवर पिवळीं, जांभळीं, पांढरीं, निळीं, वगैरे विविध रंगांचीं गेंदेदार फुलें आलीं होतीं. मध्यें वाफ्यांतून हंगामी भाजीपाला लावलेला होता आणि वाफ्यांच्या कडेनें तेरडा, झेंडू, सदाफुली ह्यांचीं रोपें होतीं. त्यांनाही फुलें आलीं होतीं. एकंदर दृश्य अगदीं स्वच्छ, प्रसन्न आणि रंगवैभवानें नटलेलें होतें. शाळेच्या त्या उजाड, मुरमाड आवाराचें हें रम्य रूपान्तर, नलिनीबाईंनीं शाळेचा चार्ज घेतल्यापासूनच्या अर्धवर्षाच्या अवधींत झालें होतें.

शाळेचा चार्ज घेतल्यापासूनच त्यांनीं अशी शिस्त, व्यवस्था आणि टापटीप लावून दिली होती कीं जी शाळा अगदीं

मोडकळीला आली होती, तिचा लौकिक वाढत चालला आणि त्याबरोबरच नलिनीबाईंचाही. चारसहा महिन्यांतच त्यांनीं सगळ्या लोकांकडून धन्यवाद मिळविले होते.

बगीच्यावरून त्यांनीं एकदा कौतुकमिश्र अभिमानानें दृष्टि फिरवली आणि त्या मार्गे वळल्या. व्हरांड्याच्या पांढऱ्या स्वच्छ भिंतीवर कुतुबमिनार, ताजमहाल, गिरसप्पाचा धबधबा अशा प्रमुख प्रेक्षणीय स्थळांचीं चित्रें टांगलेलीं होतीं. मुख्य दिवाणखान्याच्या दाराच्या वरच्या बाजूला मध्यें आलाहजरत, त्यांच्या उजव्या हाताला वलीअहद आणि डाव्या हाताला वलीअहदची पत्नी अशा राजकुटुंबाच्या रंगीत तसबिरी लावलेल्या होत्या, त्यांकडे त्यांनीं एकदा पाहिलें. चित्रें थोडीं वाकडीं झाल्यासारखें त्यांना वाटलें. त्यांनीं शिपायाला तीं सरळ करायला सांगितलें आणि त्या आपल्या खोलींत जाऊन त्या दिवशींचीं पत्रें, वर्तमानपत्रें पाहात बसल्या.

पहिल्या तासाला त्या शिकवीत नसत. कारण त्याच वेळीं कोणीतरी भेटायला किंवा शाळा पाहायला येई, पत्रव्यवहार, आदल्या दिवशींचा हिशेब, वगैरे पाहायचा असे, म्हणून त्यांनीं तो तास मोकळा ठेवला होता.

पण आज कागदपत्रें चाळण्यांत त्यांचें लक्ष लागत नव्हतें. दिवाळीची सुटी जवळ येत चालली होती. सुटींत आपल्या मावशीकडे हैदराबादला जावें कीं मामाकडे पुण्याला जावें, असा त्यांच्या मनाचा हिंदोळा चालला होता. त्यांतच दोनतीन दिवसांपूर्वी त्यांना डॉ. मधुकररावांचें पत्र आलें होतें. ते तिथेंच बदलून येणार होते आणि चार–साडेचार वर्षांनंतर त्यांची पहिल्यांदाच भेट होणार होती. त्यामुळें कुठेंच जाऊं नये, असाही एक विचार त्यांच्या मनांत येत होता. ह्या विचारांनींच त्यांच्या मनाचा आंतबाहेरला बराच भाग व्यापून टाकला होता. म्हणूनच त्यांचें कागदपत्रांत लक्ष लागत नव्हतें.

अशींच दहापंधरा मिनिटें गेलीं असतील. शिपायानें येऊन सांगितलें, कोणी बाई भेटायला आल्या आहेत.

" काय नांव ? " नलिनीबाईंनीं विचारलें.

" नांव नाई इच्यारलं जी. "

" तुला कितीदा सांगितलंय्, नांव विचारीत जा कुणी आलं तर. बरं, बोलाव. "

थोड्याच वेळानें एक तरुण, तरतरीत, काळीसावळी स्त्री आंत आली. साडेतीन-चार वर्षांचा एक मुलगाही होता तिच्याबरोबर.

नलिनीबाईंनीं उठून तिचें स्वागत केलें. तिला बसायला सांगितलें आणि त्या पुन्हा आपल्या जागेवर बसल्या. मुलालाही त्यांनीं बसायला सांगितलें, पण तो आपल्या आईला चिकटून तसाच तिच्या खुर्चीच्या बाजूला उभा राहिला.

" काय ? कांहीं काम होतं आपलं ? " नलिनीबाईंनीं त्या बाईंना विचारलें.

" तुम्ही शाळेंत लहान मुलांना घेतां ना ? "

" हो. तीन वर्षांपासूनचीं घेतों. चला, शाळा दाखवूं का तुम्हांला ? "

" पाहातां येईल. आमच्या मुलाला घालायचा आहे शाळेंत. "

" कुणाला ? ह्यालाच का ? "

नलिनीबाईंनीं मुलाकडे पाहात विचारलें. पहिल्यापासूनच त्यांचें लक्ष त्या मुलाकडे गेलें होतें. कारण त्यांना त्याचा तोंडवळा ओळखीचासा वाटत होता आणि म्हणून त्या मधून मधून त्याच्याकडे पाहातही होत्या. त्या पुढें म्हणाल्या,

" नांव नाहीं विचारलं मीं आपलं. "

" मथुराबाई. "

" आडनांव ? "

" मनसबदार. "

" मनसबदार ? "

“ हो. जरा मोगलाई नांव वाटलं असेल ना तुम्हांला? तुमच्या पुण्याकडे अशीं नांवं नसतील?”

बाई जरी साधी दिसत होती, तरी शाहाणी आणि माहितगार आहे, हें नलिनीबाईनीं ओळखलें. त्या म्हणाल्या,

“ नाहीं, मला नांव ओळखीचं वाटलं. बाकी इकडे मोगलाईंत सुभेदार, जहागीरदार, बेगमबाझार अशीं नांवं असतात, मला माहीत आहे. मी पुण्यांत राहिलें असलें तरी इकडे हैदराबादला, निझामाबादला आमची मंडळी आहेत. हा फॉर्म भरून द्या म्हणजे नांव घालतां येईल. पालक म्हणून तुमची सहीसुद्धा चालेल.”

“ उद्यां आणला तर?” मथुराबाईनीं विचारलें. त्यांना नीट लिहितां येत नव्हतें, पण तसें नलिनीबाईजवळ सांगण्याचा त्यांना संकोच वाटला.

“ चालेल. काय करतात मुलाचे वडील? मीं आपल्याला इथें पाहिलं नाहीं कधीं ह्यापूर्वी.”

“ डॉक्टर आहेत ते. आम्ही चार दिवसांपूर्वीच बदलून आलों इथें. उस्मानाबादला होतों इतके दिवस.”

“ डॉक्टर मधुकरराव मनसबदार का? त्यांचा का हा मुलगा? काय वय आहे?...”

प्रश्न तोंडून बाहेर पडतांच त्यांना वाटलें कीं आपण जास्त आणि जास्त घाईनें प्रश्न विचारले; म्हणून त्या लगेच म्हणाल्या,

“ ... म्हणजे वयाप्रमाणें वर्गांत बसवतां येईल.”

“ चार वर्षं झालीं नाहींत अजुनी! आतां माघांत होतील. तुम्हांला ह्यांचं नांव काय माहीत?”

“ एरव्हींच. मीं ऐकलं होतं, कुणी डॉक्टर मधुकरराव मनसबदार म्हणून उस्मानाबादहून बदलून येणार आहेत असं. तेच का म्हणून विचारलं. चला आतां मी तुम्हांला शाळा दाखवतें.” असें म्हणून त्या त्यांना घेऊन निघाल्या.

नलिनीबाई त्यांना घेऊन निघाल्या खऱ्या, पण त्यांचें चित्त ठिकाणावर नव्हतें. आपल्याकडे आली ही मधुकररावांची बायको आणि मुलगा हें कळल्यापासून त्या अत्यंत अस्वस्थ झाल्या होत्या. मधुकररावांनीं आपल्याला बायको आणि ३।४ वर्षांचा मुलगा असल्याची गोष्ट आपल्याला कळवूं नये, हें त्यांना फार चमत्कारिक वाटलें. पण आपल्या मनाची उद्विग्नता त्या बाईंना दाखवून उपयोग नव्हता, हेंही त्यांना कळत होतें. त्या मथुराबाईंना बरोबर घेऊन सगळें दाखवीत चालल्या होत्या. प्रायमरीच्या खालच्या मुलांसाठीं वेगळी जागा होती. त्यांच्यासाठीं नवीन पद्धतीचीं शिक्षणसाधनें होतीं. मऊ वाळूचा खड्डा खेळण्यासाठीं होता. स्वतंत्र बागेची जागा, दुपारच्या खाण्याची आणि विश्रांतीची खोली, चालण्याची शिस्त लागावी म्हणून जमिनीवर आंखलेल्या सरळ आणि कमानदार ओळी, इत्यादि मुलांच्या शारीरिक आणि मानसिक शक्तींना वाव देण्यासाठीं आणि वळण लावण्यासाठीं जीं जीं साधनें शाळेंत होतीं, तीं तीं सगळीं नलिनीबाईंनीं त्यांना दाखवलीं. पण हें सगळें त्या अगदीं यंत्रासारखें करीत होत्या, सवयीमुळें करीत होत्या. त्यांचें चित्त अगदीं व्यग्र झालें होतें.

मथुराबाई गेल्यावर त्यांनीं कारकुनाला बोलावून घेतलें आणि सांगितलें,

" मी घरीं जातें. मला जरा बरं नाहीं. आतां दुसरा तास चालू आहे, तो माझा आहे. तेवढा देशमुखांना घ्यायला सांगा. नंतर आज कांहीं मला काम नाहीं ! तुम्ही शाळा नीट बंद करून किल्ल्या पाठवून द्या माझ्याकडे. जातें मी. "

* * *

घरीं गेल्यावर पर्स, छत्री, उन्हाचा चष्मा, वगैरे वस्तु टेबलावर फेकून ती आपल्या कॉटवर जाऊन पडली.

मुलाचा तोंडवळा मधुकरसारखा आहे हें त्याला पाहातांच तिच्या लक्षांत आलें होतें आणि नंतर तर तें नक्कीच झालें. पण तिला नवल वाटत होतें मधुकरचें. त्याचें तिला दर महिन्यास पत्र येत असे. पण त्यानें कधींही आपल्या बायको-मुलाचा उल्लेख देखील केला नव्हता. आणि अगदीं दोनतीनच दिवसांपूर्वी जे पत्र आलें होतें, त्यांतही त्यासंबंधीं कांहीं नव्हतें. ह्या गोष्टीचें तिला मोठें कोडें पडलें आणि तिच्या आठवणी पांच-सहा वर्षें मागें फेकल्या गेल्या.

★ ★ ★

त्या वेळीं ती पुण्याला आपल्या मामांकडे राहून कॉलेजांत जात होती. शेजारच्या एका घरांत खोली घेऊन मधुकर राहात असे. तो मेडिकल् स्कूलचा विद्यार्थी होता.

तो तिच्याच कॉलेजांतून इण्टर सायन्स झाला होता. त्या वेळीं वाङ्मय-मंडळ, संमेलन, सहली ह्या निमित्तांनीं त्यांची थोडीबहुत ओळख झाली होती. शिवाय तो हैदराबादकडला होता आणि तिचीही एक मावशी हैदराबादला होती, त्यामुळे एकदोनदा ती त्याच्या सोबतीनें हैदराबादला गेली-आली होती.

प्रवासांत माणसाच्या स्वभावाच्या वेगळ्याच बाजू दिसतात. वृत्ति थोड्याशा फुललेल्या असतात, त्यामुळें चांगल्या बाजू अधिक चांगल्या दिसतात. त्याबरोबर एरव्हींच्या वागण्यांतली कृत्रिमता किंवा सारवासारव प्रवासांत शक्य होत नसल्यामुळें कपड्याची आंतली शिवण दिसावी तशा स्वभावांतल्या मुडपा आणि खांचेखोंचेही दिसून येतात. मधुकरबरोबर केलेल्या प्रवासांत त्याचें दरबारी सौजन्य, रुबाबदार बेफिकिरी आणि स्वभाव-सहज औदार्य जें तिला दिसून आलें, त्यामुळें तिचा त्याच्याबद्दल फारच चांगला ग्रह झाला आणि त्यानंतर त्यांचें एकमेकांकडे जाणेंयेणें, भेटीगांठी वगैरे वाढत चाललें. त्यांना एकमेकांबद्दल आकर्षण वाटूं लागलें. पूर्वी त्यांच्या सकारण भेटी होत त्या आतां

...८१

अकारणही होऊं लागल्या आणि त्याबरोबर त्यांचा सहवास वाढत चालला.

शेवटलें वर्ष होतें. दुसरी टर्म चालू होती. एक दिवस संध्याकाळीं फिरायला गेलें असतांना तो तिला म्हणाला.

" नलिनी. "

" काय ? "

" मला तुला कांहीं विचारायचंय्. "

" विचारा ना. "

" चल, आपण तिथें त्या बाजूला बसूं. "

थोडीशी एका बाजूची जागा पाहून तीं दोघें तिथें बसलीं. तो तिला म्हणाला,

" तूं यंदा बी. ए. होणार. "

" म्हणजे बी. ए. ला बसणार. "

" बसणार म्हणजे होणारच. पण तें नाहीं विचारायचं मला. "

" मग ? "

" तूं बी. ए. झाल्यावर पुढें काय करणार आहेस ? "

" कांहीं ठरवलं नाहीं अजून. आमची घरची स्थिति कांहीं विशेष चांगली नाहीं, तेव्हां मी बहुतेक बी. टी. होईन, किंवा मॉंटेसोरी कोर्स घेईन मुंबईला जाऊन आणि शाळेंतच काम करीन कुठें तरी. तुम्ही पण यंदा व्हाल L. C. P. S. मग काय करणार, नोकरी कीं प्रॅक्टिस ? "

" विचार तर प्रॅक्टिस करण्याचा आहे. परंतु पहिलीं दोनतीन वर्षं नोकरी करून नंतर प्रॅक्टिस करावी असा इरादा आहे. पण मला तुला वेगळंच विचारायचंय्. "

" मग विचारा कीं. " ती म्हणाली. तिला जरासें हसूं आले त्याचें. आणि तो काय विचारणार ह्याचा अंदाजही आला अंधुकसा.

" मला विचारायचंय्... "

ती त्याच्याकडे पाहात होती.

"...आपण लग्न केलं तर ?"

त्यानें तिच्याकडे पाहिलें.

तिची नजर खालीं वळली होती. तिनें कांहीं उत्तर दिलें नाहीं.

"तूं उत्तर देत नाहींस. आमची घरची स्थिति चांगली आहे. छोटीशी जहागीर आहे आणि शेतीही आहे चांगली."

तरीही ती कांहीं बोलली नाहीं.

"तुझी इच्छाच नसली तर गोष्ट वेगळी." तो थोडासा दुखावलेल्या स्वरांत म्हणाला.

"इच्छेचं नाहीं, पण तुमचीं मोगलाईतलीं माणसं. त्यांतून मोठीं. त्यांना तुम्हीं हें असं लग्न ठरवलेलं पसंत कसं पडेल ? त्यांनीं तुमच्यासाठीं एखादी मुलगी पाहूनही ठेवली असेल. आणि परीक्षेनंतर परत गेलांत कीं बाशिंग बांधून घेण्यासाठीं मुकाट्यानें मान वाकवावी लागेल त्यांच्यापुढें."

तिनें "नाहीं" म्हटलें नाहीं त्यामुळे त्याला जरा बरें वाटलें. तो म्हणाला,

"तें मी पाहून घेईन. आमची मंडळी माझ्या इच्छेविरुद्ध माझं लग्न करतील असं मला वाटत नाहीं. आमच्या घरांत माझ्याइतका शिकलेला आतांपर्यंत मीच आहें. इतकं करून त्यांनीं संमति नाहींच दिली, तर मी स्वतंत्र होईपर्यंत लग्नच करणार नाहीं. तुझा होकार असला म्हणजे बाकीचं मी बघेन."

"अजून पुष्कळ वेळ आहे. परीक्षा झाल्यावर पाहूं. आता आधीं अभ्यास करूं. तुम्ही आणि मीही."

त्या दिवशीं तो विषय तिथेंच राहिला. पण तिनें कांहीं त्याला नकार दिला नव्हता, त्यामुळें तो खुषींत होता. आणि त्यानंतरचें त्यांचें वागणें-बोलणें लग्न ठरल्यासारखें समजूनच होऊं लागलें. त्यांच्यांतली औपचारिकता आणि अंतर कमी

होत चाललें. भावनांच्या ऊर्मींबरोबर व्यावहारिक विचारांचा संथपणाही मधून मधून व्यक्त होऊं लागला. तिनें बी. ए. झाल्यावर मॉण्टेसोरी कोर्सच घ्यावा आणि त्यानें दोन-तीन वर्षें नोकरी करून जालना, निझामाबाद ह्यांसारख्या गांवीं प्रॅक्टिस सुरू करावी. तिनेंही तेथेंच मुलांसाठीं नवीन पद्धतीची शाळा काढावी, असे त्यांचे बेत होत आणि प्रत्येक भेटींत त्यांत कांहींना कांहीं भर पडत असे.

होतां होतां वर्ष संपलें. दिवस इतके भराभर गेले कीं मधुकरचा जाण्याचा दिवस अगदीं येऊन ठेपला, तेव्हांच त्यांना त्याची एकदम धक्का बसल्यासारखी जाणीव आली.

दुपारची वेळ होती. जेवण–बिवण आटपून येऊन मधुकर आपल्या सामानाची आवराआवर करीत होता. तेवढ्यांत नलिनीही आली. तिला पाहातांच त्यानें तिचें स्वागत केलें.

" या. एकसे दो भले. "

तीही त्याला मदत करूं लागली. त्याच्या कपड्यांची घडी करतां करतां मध्येंच थांबून ती म्हणाली,

" आतां आपली भेट पुन्हा केव्हां व्हायची ? आतां कांहीं तुम्ही परत पुण्याला येणार नाहीं आणि मीही कुठें जाईन, काय नेम ?

" नापास झालों तर यावं लागेलच कीं. "

" उगीच कांहींतरी बोलूं नका. नापास व्हायला काय झालं आहे ? "

थोडा वेळ कोणी कांहीं बोललें नाहीं. मग तो म्हणाला,

" तूं मुंबईलाच जा मॉण्टेसोरी कोर्स घ्यायला. मी एम्. बी. बी. एस्.साठीं प्रवेश मिळवायची खटपट करतों. मग आपल्याला आणखी वर्ष दोन वर्षे एकत्र राहायला मिळेल. "

" तें होईल तेव्हां होईल, आतां तर आपली भेट पुन्हा केव्हां होईल हे नक्की नाहीं. " तिचा स्वर बोलतां बोलतां जड झाला होता. पण लगेच ती म्हणाली,

“... थांबा. मी रचतें तीं पुस्तकं. कशीं भरतांहां आडवी तिडवीं!”

ती त्याच्याजवळ येऊन बसून त्याचीं पुस्तकें भरूं लागली.

तिचा गळा दाटून आला. नाकाचा शेंडा लाल झाला आणि डोळ्यांतून दोन थेंब टपकन् खालीं पुस्तकावर पडले.

“हें काय?” त्यानें म्हटलें, “रडायला काय झालं?”

“कां कोण जाणे! पण मला आपलं वाटतंय् कीं आपली कांहीं पुन्हा भेट होणार नाहीं.”

“रिझल्ट लागल्यावर कसंही करून तूं असशील तिथे भेटायला येईन. मग तर झालं? आणि मग शक्य तितक्या लवकर लग्न करूं, हं? चल आतां. आवरा-आवर केली पाहिजे.”

★ ★ ★

त्या दिवशींचा तो प्रसंग आज पुन्हा नलिनीसमोर उभा राहिला. तिला वाटले होतें त्याप्रमाणें खरोखरच त्यानंतर मधुकर तिला पुन्हा भेटला नव्हता.

त्याचा रिझल्ट लागला. तो पास झाला. ती मॉण्टेसोरी कोर्स घ्यावयास मुंबईला गेली. पुण्याहून गेल्यापासून त्याची दर महिन्या दोन महिन्यांनीं तिला पत्रें येत. त्याला मुंबईला मेडिकल कॉलेजांत प्रवेश मिळाला नाहीं. नोकरी पाहायचे ठरवलें. नेमणूक अपेक्षेपेक्षां लवकर झाली, त्यामुळें त्याला तिला भेटायला येतां आलें नाहीं. त्याची नेमणूक कुठे झाली, बदल्या कुठें कशा झाल्या, सगळें तो तिला पत्रांतून लिहीत असे आणि प्रॅक्टिस सुरू केल्याबरोबर लग्न करावयाचें हेही तो पुन्हा पुन्हा लिही. पण आपलें लग्न झाल्याचा त्याने केव्हांही उल्लेख केला नव्हता. आणि आज तर तिनें त्याची बायकोच नाहीं, तर तीन साडेतीन वर्षांचा मुलगाही पाहिला.

तिचें डोकें सुन्न झालें. त्या गोड आठवणी, तीं उत्तेजक, उन्मादक पत्रें आणि आतांचा हा प्रसंग ह्यांच्या उलट–सुलट

आघातांनीं तिचें मन अगदीं विकल, हुळहुळें झालें. तिला धड विचारही करतां येईना. तिला कळेना, मधुकरला माणूस म्हणावें कीं राक्षस. एका बाईबरोबर लग्न करून संसार करतो, मुलें होतात आणि आपल्याला त्याबद्दल अवाक्षर न कळवतां जणूं कांहीं कांहींच झालें नाहीं अशा तऱ्हेनें पत्रें लिहीत राहातो, लग्नाची भाषा बोलतो.

आणि दोनच दिवसांपूर्वी त्याचें पत्र आलें होतें कीं माझी तिथेंच बदली झाली आहे. आल्याबरोबर मी तुला भेटतों. त्यांतदेखील त्यानें बायको-मुलांचा उल्लेख केला नव्हता. ही गोष्ट लपून राहील असें त्याला वाटलें कीं कळली तरी पर्वा नाहीं इतका तो निर्लज्ज होता !

ती शाळेतून आल्याचें स्वयंपाकीणबाईनीं पाहिलें होतें. पण ती अशी कधीं कधीं लवकर घरीं येत असे, त्यामुळें तिला विशेष वाटलें नाहीं. पण तिचें सगळे काम झालें तरी नलिनी आपल्या खोलींतून बाहेर आली नाहीं, तेव्हां मात्र तिला जरा आश्चर्य वाटलें आणि ती तिच्या खोलींत आली. केंस उसकटलेले, शाळेंतले कपडे अंगावर तसेच, चेहरा अगदीं उतरलेला, अशा स्थितींत नलिनीला पाहून तिला चमत्कारिक वाटलें. ती म्हणाली,

" बरं का नाहीं ? आज लवकर आलांत तें मीं पाहिलं, पण म्हटलं, आलां असाल. पण अजून खोलींतून बाहेर आलां नाहींत तेव्हां म्हटलं बघावं, काय झालं. डोकंबिकं दुखतंय् का ? "

" तसं कांहीं नाहीं, पण मला जरा बरं नाहीं. तुम्ही जेवून घ्या आणि जा."

" तुम्हांला कांहीं करून देऊं का ? कॉफी आणूं ? "

" अं हं. मला आतां कांहीं नको. तसं कांहीं झालं नाहीं. मी उठून घेईन मग." एवढें बोलून तिनें भिंतीकडे तोंड वळवलें.

दोन तीन तास ती तशीच पडून होती. तिचें मन कोठेंही किनाऱ्याला लागेना. अखेर तीन वाजण्याच्या सुमाराला ती उठली. तोंड-बिंड धुऊन तिनें चहा करून घेतला आणि केस नीट करण्यासाठीं ती आरशासमोर उभी राहिली. पण तिला आपलेंच रूप ओळखतां येईना, इतकी तिची चर्या बदलून गेली होती. जेमतेम कंगवा फिरवून तिनें कपडे बदलले आणि ती मागल्या व्हरांड्यांत एका आरामखुर्चीवर पडून राहिली.

सरासरी पाऊण तास गेला असेल; नोकर आंत येऊन म्हणाला,

" कुणी डॉ. मनसबदार आले आहेत. "

पण ती कांहीं बोलण्यापूर्वींच मधुकर दारांत येऊन उभा राहिला आणि नोकर निघून गेला. मधुकर अंगानें भरला होता. ओठांवरच्या शानदार मिशा त्यानें कातरून निमुळत्या केल्या होत्या. त्याचा चेहेरा सस्मित दिसत होता. दमदार, उत्सुक पावलें टाकीत तो पुढें आला आणि त्यानें तिच्यापुढें हात केला. पण तिचा गळून गेलेला चेहेरा पाहून,

" हें काय? बरं नाहीं कीं काय?" असें म्हणून एक खुर्ची ओढून घेऊन तो तिच्याजवळ बसला.

तिनें त्याच्याकडे लक्ष दिलें नाहीं.

" माझं पत्र पोचलं असेल ना? मी आल्याबरोबर येणार होतों; पण चार्ज घ्यायचा, घराची व्यवस्था बघायची, त्यांत बिलकुल वेळ झाला नाहीं. आज आतां ड्यूटीवर जातां जातां आलों. "

तरी ती कांहीं बोलली नाहीं. अगदीं निश्चल मुद्रेनें ती दुसरीकडे, लांब आकाशाकडे पाहात होती.

" बोलत नाहींस कांहीं? इतक्या वर्षांनीं आज पहिल्यांदा भेटतों आहों आपण आणि तूं तोंड फिरवून दुसरीकडे पाहाते आहेस. काय पाहातेस इतकं?"

" कांहीं नाहीं. आहे काय पाहाण्यासारखं?"

तिचें उत्तर मनमोकळें नाहीं, हें त्याच्या ताबडतोब लक्षांत आलें. तो म्हणाला,

" तुझं कांहीं बिघडलेलं दिसतंय्. सांग, काय झालंय्?"

" कशाला सांगायचं? आपले काय असे लागेबांधे राहिले आहेत आतां? "

" मला कळलं नाहीं तुझं बोलणं ! "

ती जरा उठल्यासारखी होऊन बसली आणि बोलूं लागली,

" नाहींच कळायचं ! तुम्ही जाणून बुजून वेड पांघरतांहां कीं तुम्हांला तुम्ही काय केलंत ह्याची जाणीवच नाहीं ?"

तिचा स्वर अगदीं तीव्र झाला होता.

"...माझं जीवन प्रसन्न आहे, फुललेलं आहे आणि त्याला आणखी बहर येणार आहे, अशा सुखपुष्पांच्या राशीवर मी विश्वासाने लोळत होतें, त्यावर आज निखारा पडला आणि माझं जीवन जळून खाक झालं. आणि हा निखारा तुम्ही टाकलात. "

" मीं ? "

" हो तुम्ही. " ती त्वेषानें बोलत होती, " इतकीं वर्षे तुम्ही मला पत्रं लिहीत होतां, त्यांत प्रेमाची भाषा बोलत होतां, लग्न करायचे बेत मांडीत होतां, पण तुमचं लग्न आधींच झालेलं होतं, तुमचा संसार चाललाच होता, तुम्हांला मुलंबाळंही होतच होतीं, हें तुम्हीं मला एका अक्षरानेंही कधीं कळवलंत नाहीं. कां लपवून ठेवलंत हें माझ्यापासून? काय मिळालं त्यांत तुम्हांला? एक जीवन उखडून फेकून देण्यांत काय लाभ झाला तुम्हाला ? "

ती एवढें बोलली, त्याचा तिला थकवा आला अगदीं. ती पुन्हा स्वस्थ पडून राहिली. तिचें बोलणें ऐकतां ऐकतां मधुकरचा चेहेरा गंभीर होत चालला होता. तिचें बोलणें संपल्यावर थोडा वेळ थांबून तो म्हणाला,

" खरं आहे. ह्या गोष्टी तुला कळवल्या नव्हत्या. तुला कदाचित् आठवत असेल, मीं तुला लिहिलं होतं कीं घरांत एक गोष्ट घडली आहे, त्यासंबंधीं मी तुला समक्षच सांगेन. आठवतं ? "

" ती गोष्ट ही ? "

" होय. तुला माझा संसार चालला आहे, मला मुलंबाळं होताहेत असं दिसतं आहे खरं, पण तुला कल्पना नाहीं, माझं लग्न कशा परिस्थितींत झालं त्याची. सगळं मला पत्रांतून लिहितां आलं असतं, तरी तुला नीट कळलं नसतं. मी आतां समक्षच तुला सांगणार होतो सगळं. मला वाटलं नव्हतं ही आजच मुलाला शाळेंत घालायला आणील आणि माझ्या आधीं तुला भेटेल. "

" काय ऐकून करायचं आहे आतां ? जें झालं तें झालं. "

" पण ऐकून तर घे. मग तुला योग्य वाटेल तसं कर..."

ती कांहीं बोलली नाहीं किंवा त्याच्याकडे तिने दृष्टिही वळवली नाहीं ! पण तोच सांगूं लागला,

"...तुला मीं म्हटलं होतं, माझे आईवडील माझ्या इच्छेविरुद्ध जाणार नाहींत ; पण त्यांनीं माझं कांहीं ऐकलं नाहीं. मी मॅट्रिक झालो, तेव्हांच माझं लग्न व्हायचं. इकडे मोगलाईंत अजून मुलांचींसुद्धा बरींच लवकर लग्नं होतात. पण माझं लग्न ह्या ना त्या कारणानें लांबत गेलं. तेवढ्यांत माझी तुझ्याशीं ओळख झाली आणि मी वडिलांना ' नाहीं ' म्हणत गेलों. पण मी तिकडे पुण्याला असतांनाच त्यांनीं इकडे एक मुलगी ठरवून टाकली. व्याह्यांना वचन देऊन टाकलं. आमच्या आजोळच्या नात्यांतलींच आहेत. फार मोठीं माणसं आहेत...

" ऐकते आहेस ना ? " त्यानें मध्येंच तिला विचारलें. तिनें उत्तर दिलें नाहीं, पण ती ऐकत होती. तो पुढें बोलूं लागला,

"...मीं जेव्हां निक्षून नाहीं म्हणून सांगितलं, तेव्हां वडील म्हणाले, 'आमचं नाक खालीं करणार तूं.' आणि एकदा 'हो' म्हणून मुलगी नाकारली तर तिचं लग्न व्हायला अडचण येणार आणि वर त्यांच्या लौकिकाला बट्टा लागणार अशा पेंचांत त्यांनीं मला घातलं..."

त्यानें पुन्हा एकदा तिच्याकडे पाहिलें. ती तशीच निश्चल बसली होती.

"...मी म्हटलं 'तुम्ही मला विचारायचं तरी होतंत.' पण मुलगी माझ्या माहितींतली होती. मला विचारायची जरूर नाहीं वाटली त्यांना. नाहीं तरी आमच्याकडे अजूनही तसं विचारण्याची जरूरच वाटत नाहीं. मुलाचं लग्न करून देणं हें आईबापांचं कर्तव्य आहे अशीच इकडे समजूत आहे. आपलं कर्तव्य ते करीत असतात. त्यांनीं सर्व नीट पाहिल्यावर मुलाला विचारण्याची जरूरच वाटत नाहीं त्यांना."

ती स्थिर दृष्टीनें त्याच्याकडे पाहात म्हणाली,

"तुम्हांला घरांतून निघून जातां आलं असतं. तुम्हांला बांधून तर ठेवलं नव्हतं ना त्यांनीं? असो. ती तुमच्या मर्जीची गोष्ट होती. पण निदान मला सगळं कळवायचं. उलट तुम्ही तिकडे संसार करीत राहिलांत आणि मलाही पूर्वीसारखींच पत्रं पाठवून फसवीत राहिलांत."

बोलतां बोलतां तिचा स्वर रुक्ष झाला होता.

"मीं तुला फसवलं नाहीं, नलिनी. माझं तुझ्यावरच प्रेम होतं आणि अजूनही तुझ्यावरच आहे."

"अजूनही! तुम्हीं असं बोलावं ह्याचं मला नवल वाटतं."

"पण तें खरं आहे. मला ह्या संसारांत मुळींच आसक्ति नाहीं. आणखी वर्ष-सहा महिन्यांनीं मी नोकरी सोडून प्रॅक्टिस सुरू करणार आहें, तेव्हां आपण लग्न करूं. मग मी तिची कांहीं तरी दुसरी सोय करीन....किंवा आतांच लग्न करायचं

का ? माझी तयारी आहे. मी आतांसुद्धा तिची दुसरी व्यवस्था करतों."

"खरोखर तुमचं बोलणं कळत नाहीं. आतां, ह्या क्षणीं तुम्ही एका बाईबरोबर संसार करतां आणि माझ्याशींही लग्न करतों म्हणतां, हें कसं शक्य आहे ? तुमच्या मोगलाईत ह्या अशा गोष्टी चालत असतील, आणि तुम्हांला त्याचं कांहीं वाटतही नसेल, पण माझ्या मनाला तर ती कल्पनाही सहन होत नाहीं."

"त्यांत कठीण कांहीं नाहीं, नलिनी! माझं खरोखर तुझ्यावरच प्रेम आहे. हा संसार आपला उगीच चालला आहे यंत्रासारखा."

"मला नाहीं खरं वाटत."

"कां ?"

"एखाद्या बाईची इच्छा नसली तरी तिला नवऱ्याच्या इच्छेपुढें वाकावं लागतं. त्याची वंशवेल वाढवावी लागते हें मी पाहातें...पण बायकांची गोष्ट वेगळी आहे...

"एखाद्या पुरुषाला आपल्या इच्छेविरुद्ध लग्न करावं लागेल, तो कदाचित् घरही करील हें मला पटतं. पण बायकोबद्दल कांहींच भावना असल्यावांचून तो तिच्याबरोबर संसारही करीत राहील...मला नाहीं पटत."

"म्हणजे तुला माझं म्हणणं खरं नाहीं वाटत ?"

"खरं म्हणजे नाहीं वाटत. पण खरं असलं तर तुमचं वागणं मला भावनाहीन वाटतं. अशा माणसाशीं मी संसार करूं शकेन ? मला नाहीं पटत तें."

"नलिनी, तूं माझ्यावर अन्याय करते आहेस."

"असेन. पण मला ती कल्पनाच सहन होत नाहीं."

"म्हणजे मला आशा नाहीं ?"

"नाहीं."

" नलिनी, तूं ह्या प्रश्नाकडे असं पाहाशील असं नव्हतं मला वाटलं."

" तुम्ही असे वागाल असं मलाही वाटलं नव्हतं."

" माझं भवितव्य माझी अशी वंचना करील अशी मला कल्पना नव्हती."

" पण अशा स्थितींत मीं तुमच्या म्हणण्याला मान्यता देणं, म्हणजे तुमची, माझी आणि जीवनाचीही वंचना करण्यासारखं आहे. तें मी करणार नाहीं."

एवढें बोलून तिनें मान खुर्चीवर मागें टाकली.

" मी जाऊं ?"

ती बोलली नाहीं.

" मुळींच आशा नाहीं ?"

ती आधीं कांहीं बोलली नाहीं. जरा वेळानें म्हणाली,

" गळलेलं फूल पुन्हा उचलून डाहळीला जोडतां येत नाहीं."

तो खालीं मान घालून जड पावलें टाकीत बाहेर पडला.

# दीड दिवस

गाडीनें मनमाड सोडलें. आणखी दोन तीन तासांनीं उतरण्याचें ठिकाण येणार. माझ्या मनांत त्यासंबंधींच विचार येत चालले. रोहिणकरची आणि माझी पांच सात वर्षांत, म्हणजे कॉलेज सुटल्यापासून, भेट झाली नव्हती. बी. ए. पर्यंत आम्ही बरोबर होतों. पुढें तो 'लॉ'कडे गेला. मी एम्. ए. च्या टर्म्स भरूं लागलों. त्या अवधींत आमच्या क्वचित् भेटीगांठी होत. पण वकिलीची परीक्षा पास होऊन तो पुढे इकडे मोगलाईत आला आणि मीं मुंबईत नोकरी धरली. व्यवसाय वेगळे, राहाणें इतकें लांब, त्यामुळें त्यानंतर त्याची माझी गांठ पडली नव्हती.

गाडी धडाड् धडाड् करीत चालली होती. त्या तालावर माझे विचारही हिंदळत होते. रोहिणकरची वकिली कशी चालली असेल? तो मला घ्यायला बहुधा येईलच स्टेशनावर. त्यानें स्वतःचें घर बांधलें असेल! त्याचें लग्नही झालें असेल!

बायको शिकलेली असेल का? आणि दिसायला कशी असेल? वागण्याची पद्धत पुण्या–मुंबईकडल्यासारखी असेल कीं मोगलाईतली कांहीं वेगळी असेल? कदाचित् ती बाहेरही येणार नाहीं. चार दिवस सुटीसाठीं म्हणून चाललों आहें खरा. कसे दिवस जातील?

मी रोहिणकरच्या संसाराचीं काल्पनिक चित्रें पाहात असतांनाच गाडीची गति कमी झाली. रुळांच्या सांध्यावरून गाडी खडाडूं लागली. कांहीं लोक उठून सामानाची बांधाबांध करूं लागले. माझें उतरायचें स्टेशन आलें होतें. मीही उठून सामान आवरूं लागलों.

इतक्यांत स्टेशन आलेंच. मीं खिडकींतूनच हमालाला हाक मारली. गाडी थांबतांच खिडकींतूनच माझें सामान त्याच्याजवळ दिलें आणि मग खालीं उतरून इकडे तिकडे पाहूं लागलों.

नेहरू फॅशनचा रेशमी सदरा घातलेले, भरदार अंगाचे एक गृहस्थ अगदीं माझ्याजवळ आले. त्याच्याकडे पाहायला मी वळलों, तोंच ते म्हणाले,

" चला."

'अरे, रोहिणकरच कीं!' मीं मनांत म्हटलें. गृहस्थ किती मोठा आणि भरदार दिसूं लागला होता!

" सामान टांग्यांत ठेव." त्यानें हमालाला फर्मावलें आणि मला बरोबर घेऊन तो स्टेशनाबाहेर पडला. बाहेर पडतांना तिकिट-कलेक्टरनें त्याला अदबीनें सलाम केला.

टांग्यांत सामान व्यवस्थित ठेवलेलें होतें. पण मीं पाहिलें, टांगा भाड्याचा नव्हता.

हमालासाठीं मी पैसे काढूं लागलों, तों रोहिणकरनें आपला डावा हात माझ्या हातावर ठेवून मला थांबवलें आणि उजव्या हातानें आपल्या खिशांतून पैसे काढून हमालाला दिले. ते घेतांना त्यानेंही वाकून 'राम राम' केला.

एकंदरींत त्याचा सगळीकडे बराच दबदबा दिसला. बाहेरगांवीं चांगल्या खाजगी टांग्यांत बसण्याचें सुख कांहीं वेगळें असतें. खडीच्या रस्त्यावरूनसुद्धा एक घोड्यांच्या टापांखेरीज दुसरा कसलाही आवाज न करतां वेगानें चाललेल्या त्या टांग्याचें हें सुख मी घ्यायला लागलों होतों, तेवढ्यांत रोहिणकरचे शब्द माझ्या कानांवर आले.

"हं, कसं काय? I am glad you came! हल्लीं काय करीत असतां? तुमचे लेख, गोष्टी वगैरे येत असतात मधून मधून कशांत तरी. होय ना?"

त्याच्या त्या स्वराचें मला चमत्कारिक वाटलें. यशस्वी माणसाची, किंचित् वरून खालीं पाहाण्याची, झांक त्यांत मला जाणवली.

विशेष उत्तर देण्यासारखें त्याच्या प्रश्नात कांहीं नव्हतेंच म्हणून मीं सहज म्हटलें,

"तूं स्वतःसा आलास घ्यायला स्टेशनवर? ही म्हणजे तुझी कामाची वेळ असेल. बाकी वकिलांना काय, कुणाची ताबेदारी थोडीच असते!"

"चालायचंच एखाद वेळ असं. पुष्कळ लोक आपल्या नोकरांना पाठवतात पाहुण्यांना घ्यायला. मला तें पसंत नाहीं. कुणीही पाहुणा असो, आपण स्वतः घ्यायला जायचं, असा माझा नियम आहे. That is the proper thing, you see"

मला पुन्हा थोडें अस्वस्थ वाटलें.

आणखी अशींच चारदोन रेंगाळतीं प्रश्नोत्तरें झालीं, तोंच टांगा त्याच्या आवाराच्या फाटकाशीं उभा राहिला. टुमदार बंगलेवजा घर, फाटकावर जाईच्या वेलीची कमान, आंत बंगल्याकडे जाणाऱ्या चिंचोळ्या रस्त्यावर खड्या-खड्याची वाळू, रस्त्याच्या दुतर्फा विटांच्या टोकदार किनारींच्या वाफ्यांतून मोगऱ्याचीं, गुलाबाचीं, शेवंतीचीं रोपें, व्हरांड्याच्या

जोत्यालगत विलायती फुलांच्या कुंड्या. एकंदरींत लहानशा गांवच्या सुखवस्तु घराचीं सर्व वैभवचिन्हें तिथें होतीं.

* * *

मला एक स्वतंत्र छोटी खोली दिली होती. स्वच्छ पलंगपोस घातलेली एक कॉट, एक टेबलखुर्ची, एक आराम-खुर्ची, खुंटाळें, मोटासा आरसा...पाहुण्यांची प्रत्येक गरज आणि अडचण ओळखून तिची तरतूद केलेली होती.

मला खोलीत सोडून रोहिणकर म्हणाला,

"तुम्ही कोणत्याही प्रकारची गैरसोय करून घेऊं नका. कांहीं लागलं तर हा गडी आहे, याला सांगा. मी थोडंसं आजचं काम आहे तेवढं बघून घेतों. साडेदहाला जेवायचं होईल. चालेल ना? धोंडू, ह्याना हातपाय धुवायला दाखव आणि काय हवं नको पाहा."

मी तोंडबिंड धुऊन खोलींत परत आलों, तों टेबलावर चहा आणि बिस्किटें ठेवलेलीं होतीं. मीं धोंडूला म्हटलें,

"मी एकटाच? साहेब नाहीं घेत?"

"त्यांचा सकाळींच झाला." त्यानें उत्तर दिलें.

मी खुर्ची पुढें ओढून बिस्किट चावीत चहा घेऊं लागलों. इतका व्यवस्थित, रेखीव पाहुणचार पाहून मी दबून गेलों होतों. माझी बिलकूल गैरसोय नव्हती; पण त्यानें मला चांगलें मोकळें वाटायच्याऐवजीं पदोपदीं दोरीला बांधून फिरवल्या-सारखें वाटत होतें.

मीं खोलींत चौफेर नजर टाकली. पाहुण्यांच्या डोळ्यांना बरें वाटावें म्हणून भिंतीवर चित्रेंही टांगलेलीं होतीं. संगमरवरी पायऱ्यांवर बसून पाण्यांत पाय सोडणाऱ्या अर्धनग्न युरोपियन युवती एका चित्रांत होत्या. दुसरीकडे एक खूप मोठ्या घेराचा झगा घातलेली तरुणी एका झाडाच्या बुंध्यावर हृदयाची आकृति कोरीत उभी होती. एक कॅलेण्डरही होतें.

तिरक्या मानेनें आणि तिरप्या नजरेनें पाहाणाऱ्या त्यांतल्या बाईचे ओठ लाखेनें रंगवल्यासारखे तकाकत होते आणि किंचित् उघडलेल्या त्या ओठांतून तिचे चार सहा शुभ्र दांत दिसत होते. ती स्मित करीत होती हें उघड होतें, पण मला त्याचें मुळींच आकर्षण वाटलें नाहीं.

चहाचा कप संपवून मीं खालीं ठेवला. तोंच धोंडू आंत येत म्हणाला,

" दाढी करायची असेल ना ? पाणी आणलं आहे गरम. "

बोलत बोलतच त्यानें एका चिनी मातीच्या भांड्यांत पाणी ओतून तें आरशासमोरच्या फळीवर ठेवलें आणि दाढीच्या साहित्यासाठीं तो माझ्या सामानाकडे पाहूं लागला.

मला थोडेंसें चिडल्यासारखेंच झालें. ही माझी बडदास्त चालली होती कीं माझ्यावर पहारा चालला होता ? मी म्हणालों.

" मी घेतों सामान काढून. "

मला वाटतें, मी जरा मोठ्यानेंच बोललों असेन. कारण तो झटकन् बाजूला झाला आणि चहाचें साहित्य गोळा करून घेऊन गेला.

दाढी झाल्यावर मग धोंडूनें येऊन विचारण्याच्या आधींच मी स्नानाच्या तयारीनें पाट पाहात राहिलों.

स्नानाच्या खोलींत एक गरम पाण्यानें आणि एक गार पाण्यानें अशा दोन मोठ्या बादल्या कांठोकांठ भरून ठेवलेल्या होत्या. एक कॅरबॉलिक, एक वासाचा आणि एक कपड्याचा असे तीन प्रकारचे साबण होते. किंचित् उंचावर कलता टांगलेला, सबंध शरीर आंत दिसेल असा, मोठा बिलोरी आरसा होता.

" आणखी गरम पाणी लागलं, तर ही तोटी सोडा आणि गार हवं असलं तर ही इथली. " धोंडू म्हणाला.

" ठीक आहे. ठीक आहे. " म्हणून मीं त्याला घालवलें.

* * *

...९७

स्नान उरकून मी व्हरांड्यांत फिरत होतों. बगीच्यांतलीं रंगीबेरंगी फुलें फुलून उन्हानें उजळून निघालीं होतीं. त्यांचा मंद सुवास मधून मधून येत होता. मला जरा मोकळें आणि प्रसन्न वाटलें. आजूबाजूला असेच बंगले होते. गांवाबाहेरची सुखवस्तु लोकांची वसाहतच होती ती. त्यांतल्या त्यांत अधिक संपन्न अशीं जीं थोडींशीं घरें होतीं, त्यांपैकींच रोहिणकरचें होतें, हें त्याच्या बाहेरच्या थाटावरूनच दिसत होतें.

एकंदरींत सातआठ वर्षांत त्यानें चांगलेंच बस्तान बसवलें होतें असें दिसलें. स्वतःचें घर बांधलें होतें. घरचा टांगा होता. घर सुसज्ज होतें. तैनातीला गडीमाणसें होतीं. कॉलेजांत असल्यावेळेपासून रोहिणकर होता आकांक्षीच. इकडेच औरंगाबाद जिल्ह्यांत त्याची शेतीवाडी होती, म्हणून इकडेच येऊन वकिली करायची, असें त्यानें तेव्हांच ठरवलें होतें. मुन्सफ वगैरे व्हायचें नाहीं, त्यांत कर्तबगारीला वाव नसतो, असें तो म्हणे. पण त्याला जेवढें यश मिळालें, तेवढे मिळेल असें त्यालाही त्या वेळीं वाटलें नसेल. माझा दुसरा एक मित्र औरंगाबादलाच वकिलीची पाटी लावून बसला होता. पण तीन वर्षांत त्याला नोकरी पाहावी लागली. रोहिणकर भाग्यवान् म्हटला पाहिजे.

पण मला त्याची बायको, आई किंवा घरांतलीं इतर माणसें कोणी कुठें दिसलीं नाहींत, ह्याचें नवल वाटलें. बायकामंडळी कुठें बाहेरगांवीं गेली होती कीं त्यानें लग्नच केलें नव्हतें? कीं मोगलाई म्हणून बायकांची ओळख करून द्यायची नाहीं, असा रिवाज होता? कोणाच्या घरीं गेलें, विशेषतः मित्राच्या, आणि त्यानें आपली बायको, आई आणि घरचीं माणसें ह्यांची ओळख करून दिली नाहीं, तर कसें परकें, चमत्कारिक वाटतें! तो कडक नियमांनीं बांधलेला आदर्श पाहुणचार आणि हा असा प्रकार. मला वाटूं लागलें, मी उगीचच आलों ह्याच्याकडे.

सहज घड्याळाकडे पाहिलें. साडेदहा होत आले होते. तेवढ्यांत रोहिणकर आपल्या खोलींतून बाहेर येत म्हणाला,

" चला. जेवायला चलायचं ना ? "

" चलायचंच् " मीं म्हटलें, " पण मला तुला असं विचारायचंय् कीं तूं मला ' अहो जाहो ' कां म्हणतोस ? वर्षानुवर्षं आपण एकमेकांना एकेरी हाक मारली. मला हें चमत्कारिक वाटतं ! "

" छे, छे, तसं कांहीं नाहीं ! इथें कुणाला ' अरे जारे ' म्हणायची सवय नाहीं. त्यांत पुन्हा सात आठ वर्षांत आपली भेट झाली नाहीं, म्हणून. बाकी कांहीं नाहीं. चल. "

त्यानें मनगटावरच्या घड्याळांत पाहिलें.

*    *    *

" हे श्रीयुत श्रीनिवास. " जेवायला सुरुवात झाल्यावर, जरा वेळानें, स्वयंपाकघराच्या दाराकडे पाहात तो म्हणाला. मींही तिकडे पाहिलें.

तिथें वहिनी उभ्या होत्या. वहिनीच असाव्यात त्या. आम्ही जेवायला येऊन बसल्यावर एक दोनदा त्या वरण, तूप असें कांहीं तरी वाढायला आल्या होत्या. पण मीं त्यांना नीट पाहिलें नव्हतें. त्यांचे गोंडस हात, केळफुलांतल्या फणीसारखीं नाज़ूक निमुळतीं तांबूस बोटें, त्यांच्या टोकांचीं स्वच्छ. गुलाबी नखें, एका बोटांतली माणकाची अंगठी, आरक्त छटेचीं सुबक पावलें, डाळिंबी रंगाचें लुगडें, वळणदार, दाट काळसर तपकिरी केस आणि त्यांतून गेलेला, रांगोळीच्या रेषेसारखा बारीक, सरळ भांग, एवढेंच अधून मधून माझ्या दृष्टीस पडलें होतें.

आतां दाराच्या झडपाला आंतल्या बाजूनें टेकून उभ्या होत्या त्या. त्यांचा बांधा नीटस होता. चेहेरा प्रसन्न, जिवणी हसरी आणि दांत रेखीव, स्वच्छ, सुंदर होते. शरीरांत किंचित् स्थूलपणा होता, पण किंचित् स्थूल शरीराच्या बायका स्नेहाळ

स्वभावाच्या असतात, असें माझें मत असल्यामुळें, माझा त्यांच्याबद्दल चांगला ग्रह झाला.

त्यांच्याकडून पुन्हा रोहिणकरकडे पाहात मीं म्हटलें,

"ठोसरांनीं आपल्या आईला कोल्हटकरांची ओळख करून दिली, तशी नाहीं ना?"

"म्हणजे!" तो म्हणाला, "कोल्हटकर कोण हे? अच्युतराव का? कीं प्रभाकर?"

माझा संदर्भ त्याला कळला नाहीं. मी त्याला समजून सांगितलाही नाहीं. वहिनींना कळला. त्या थोड्याशा हसून म्हणाल्या,

"तसं कांहीं नाहीं!"

"हें तुमचं कांहीं तरी साहित्य दिसतं आहे!" रोहिणकर किंचित् दुखावलेल्या स्वरांत म्हणाला, "आपण कांहीं साहित्यबिहित्य वाचीत नसतों आणि वेळही नसतो मला घालवायला. ही मात्र वाचीत असते कांहींतरी. परवां कुठें तरी तुझी गोष्ट पाहिली मीं तेव्हां सहज म्हटलं, 'आम्ही कॉलेजांत बरोबरच होतों,' तर म्हणाली, 'इकडे येतीलच केव्हांतरी.' परवां तुझं पत्र आलं तेव्हां, मला वाटतं, माझ्यापेक्षा तिलाच जास्त आनंद झाला. काय, खरं कीं नाहीं?"

असें म्हणून त्यानें पुन्हा वहिनींकडे पाहिलें.

"कांहीं तरीच काय सांगायचं?" त्या म्हणाल्या आणि त्यांचा गोरा चेहेरा अगदीं गुलाबी झाला.

"पण तूंसुद्धा एकदा थोडंबहुत लेखन केलं आहेस, हें वहिनींना माहीत आहे कीं नाहीं?" मीं रोहिणकरला म्हटलें.

"म्हणजे, कॉलेज–मॅगेझिनमध्यें एकदा गडकऱ्यांच्या सिंधूवर आणि एकदा जझिया करावर लिहिलं, तेंच ना? गडकऱ्यांच्या सिंधूचं असं आहे, कॉलेजांत जाणाऱ्या प्रत्येकानें एकदा तरी तिच्यासंबंधीं लिहिलंच पाहिजे, ह्या शिरस्त्याला

धरून त्या वेळीं मीं लिहिलं. तें तितकंच. मला वाटतं, सुधाकरानें आणि त्याच्या दारूनें केले नसतील इतके सिंधूचे हाल कॉलेज–विद्यार्थ्यांनीं आणि तुम्हीं साहित्यिकांनीं केले आहेत. त्यांना खरं म्हणजे आतां कायद्यानें बंदी करायला पाहिजे. जझिया कराचा जो लेख होता..."

त्याचें वाक्य अर्धवटच राहिलें. वहिनी पुऱ्यांचें ताट घेऊन माझ्या पानासमोर वाढण्यासाठीं वाकून उभ्या होत्या. मी रोहिणकरचें बोलणें ऐकत हातानें नको म्हणत होतों. तो म्हणाला,

"अरे, कांहीं जेवीत नाहींस तूं? डाल्डांतल्या नाहींत त्या. घरच्या तुपाच्या आहेत. वाढ त्याला."

"पण माझ्या देहाकडे तर पाहा!" मी म्हणालों, "खर म्हणजे तुलाच आणखी वाढायला हव्यात."

"हं, वाढ तूं, वाढ." माझें न ऐकतां त्यानें वहिनींना फर्मोविलें.

पानावर हात आडवा धरीतच मीं वहिनींकडे पाहिलें. त्याच वेळीं त्यांनींही माझ्याकडे पाहिलें. आणि...आणि... त्यांच्या ताटांतल्या सगळ्या पुऱ्या माझ्या पानांत पडल्या. ताटही पडायचें, पण त्यांनीं तें जेमतेम सावरलें.

त्या अगदीं ओशाळून गेल्या.

"काय हें!" रोहिणकर म्हणाला. त्याच्या स्वरांत करडेपणा होता. मला कसेंसेंच वाटलें.

मीं म्हटलें, "अरे, त्यांची कांहीं चूक नाहीं. मी 'नको' म्हणत होतों. तूं आग्रह करीत होतास."

"म्हणून काय झालं?"

त्यानंतर कांहीं वहिनी पुन्हा वाढायला आल्या नाहींत. आणि बोलणेंही विशेष झालें नाहीं.

* * *

जेवण झाल्यावर मीं आपल्या खोलींत येऊन अंग टाकलें. बिछाना मऊ होता, पलंगपोसाला कसला तरी मंद सुगंध येत होता. बागेंतून आलेल्या गार वाऱ्याच्या झुळका मधून मधून आंत शिरत होत्या. भिंतींवरचीं चित्रेंही आतां इतकीं निर्जीव वाटत नव्हतीं. वहिनींच्या ताटांतल्या सगळ्या पुऱ्या घसरून माझ्या ताटांत पडल्या, त्यामुळेंच मला वाटतें, सगळीकडे जो ताण बसल्यासारखा झाला होता तो सैल पडला.

आणि त्याहूनही एक सुखावह विचार माझ्या मनांत येत होता. मोगलाईतल्या त्या तशा लहानशा गांवांतसुद्धा साहित्य आवडीनें वाचणारी एक तरुण गृहिणी अनपेक्षितपणें आढळावी, ह्यानें साहजिक मला आनंद वाटला होता. पण त्याबरोबरच मला तिथली ती शिस्त, रोहिणकरची वाङ्मयाबद्दलची वृत्ति, ह्यांचीही आठवण झाली आणि मनांत आलें, वहिनींच्या रसिक मनाची किती कुचंबणा होत असेल!

रोहिणकरचा तो करडा शिस्तबाजपणा आणि वहिनींची बुजरी, नाजुक रसिकता ह्यांच्यासंबंधीं विचार करीत असतांनाच केव्हां तरी मला झोप लागली.

संध्याकाळच्या साडेचार–पांचचा सुमार होता. मी कॉटवरच पडल्या पडल्या माझ्याबरोबरचें एक मासिक चाळीत होतों. तेवढ्यांत धोंडू येऊन म्हणाला,

"चहा तयार आहे."

"साहेब आले का?" मीं विचारलें.

"होय, मघांशींच. आपल्याला झोप लागली होती म्हणून उठवलं नाहीं."

मी उठून तोंड–बिंड धुऊन मागल्या पडवींत रोहिणकर बसला होता तिथें जाऊन बसलों. थोड्याच वेळांत वहिनीही आल्या आणि त्यांच्या मागोमाग चहाचा ट्रे घेऊन भटजी आला.

वहिनी चहाची तयारी करीत होत्या. रोहिणकर म्हणाला,

"दुपारचा चहा आम्ही एकत्र घेतों. सकाळीं हिला स्वयंपाकघरांत बघावं लागतं. शिवाय मुलांचं कांहीं ना कांहीं असतंच. तेव्हां ह्या वेळचा चहा मात्र एकत्र घ्यायचा असा मीं नियम केला आहे."

वहिनी माझ्या कपांत चहा ओतीत होत्या. त्यांना तो म्हणाला,

"पाहा हं, सांभाळून. नाहींतर सकाळसारखं करशील आणि किटलीच पाडशील!"

वहिनींचीं बोटें नकळत किटलीच्या कडीवर आंवळलीं गेलीं. त्यांनीं दुसरा हात किटलीला लावला. पण त्यांचा चेहेरा मात्र गोरामोरा झाला. सकाळची आठवण ह्या वेळीं रोहिणकरनें करून द्यावी, हें मलाही जरा चमत्कारिक वाटलें.

मीं म्हटले, "बरंच कडक दिसतंय् तुझं काम!"

"कडकचा प्रश्न नाहीं. पण मला असला नर्व्हसपणा आवडत नाहीं..."

'असला नर्व्हसपणा म्हणजे कसला?' मीं मनांत म्हटलें. माझ्यासमोर–आपल्या मित्रासमोर–त्या बावरल्या. त्यांची चल-बिचल झाली, हें त्याला आवडलें नाहीं का? त्याचें बोलणें चालूच होतें.

"...सगळं कसं व्यवस्थित, रेखीव पाहिजे. माझं सगळं करिअर त्याच्यावर आधारलेलं आहे. हें घर, हा टांगा, हे नोकरचाकर. आज मी इथल्या पहिल्या तीन वकिलांत आहें. आलों तेव्हां किती झटापट करावी लागली! किती त्रास झाला पहिलीं तीन चार वर्षे! नंतर सीनिअर लोकांपैकीं एक हैदराबादला गेले, एक अचानक वारले. अनपेक्षित संधि मिळाली. ह्या रिकाम्या जागेवर आज ना उद्यां जाणार, असं मीं ठरवलं आणि आतां मी तिथें गेलों आहें. कशामुळें?

चिकाटी, शिस्त, सतत काम. हिला ह्या सर्व गोष्टींची कल्पना नाहीं. माझं पूर्वीचं स्ट्रगल् तिनें पाहिलं नाहीं. म्हणून मी तिला नेहमीं सांगत असतों...."

वहिनी उठून आंत गेल्या होत्या. मला गुदमरल्यासारखें वाटूं लागलें. माझ्या मनांत आलें, हें सगळें प्रवचन ह्या वेळीं देण्याची जरूर काय? माझ्या येण्यानें त्यांच्या संसाराच्या शांत जलाशयांत कांहीं खळबळ उडाली कीं काय? तो चिडल्यासारखा कां दिसतो? असें जर नेहमींच होत असेल, तर त्या मुलीची काय स्थिति होत असेल? मला वाटलें, आपण उगीच इथें आलों. आतां इथें मुळींच राहूं नये. आणखी एखादा मोठा स्फोट व्हायचा कदाचित् आणि मग वहिनींना... "

मी उठून जाऊं लागलों.

"चला, आतां आपण क्लबांत जाऊं." रोहिणकर म्हणाला, "सहाच्या सुमाराला क्लबांत जायचं आणि आठला तिथून निघायचं, असा माझा नियम आहे. खरं म्हणजे मला तिथलं तें Mediocre वातावरण आवडत नाहीं. पण क्लबांत जाणं बरं असतं. लोकांशीं संबंध ठेवले पाहिजेत. It helps..."

"मला आलंच पाहिजे का? मी येऊन काय करणार? आज रात्रींच्या गाडीनें जाईन म्हणतों मी..."

"नॉनसेन्स! आज आलास आणि आजच जाणार? आलास तसा चारआठ दिवस तरी राहिलंच पाहिजे तुला. चल, कपडे बिपडे करायचे असतील ते कर. आणि हो, आज रात्रीं तुला भेटायला इथले कांहीं लोक येणार आहेत."

"मला भेटायला? कोण?"

"इथें साहित्यसभा कीं कायसं आहे. त्याचे चिटणीस यायचेत. त्यांचा कांहींतरी समारंभ करण्याचा विचार आहे उद्यां. उद्यां सुटी आहे."

क्लबांत गेल्यावर रीतीप्रमाणें ओळखी झाल्या. थोडेंसें इकडलें तिकडलें बोलणें झालें. हळुहळू एक एक जण आपापल्या गटांत गेला. ब्रिजमध्यें मला गोडी नव्हती म्हणून मी टेनिस कोर्टावर गेलों. मंडळींनीं ' खेळतां का ? ' विचारलें, म्हणून खेळलोंही थोडा वेळ. पण बरींच वर्षें सवय सुटल्या-मुळें माझ्या हातून चुका होऊं लागल्या. म्हणून मग मीं कोर्ट सोडलें आणि क्लबाच्या लायब्ररींत गेलों. तिथल्या कपाटांत इम्पीरिअल गॅझेटिअरचे कांहीं भाग, इंग्रजी डिटेक्टिव्ह आणि तत्सम कादंबऱ्या आणि बर्क, कार्लाइल, इमर्सन, मोर्ले ह्यांच्यासारख्यांचीं पुस्तकें होतीं.

इकडे तिकडे करून मीं कसातरी थोडा वेळ काढला. पण मन लागेना म्हणून अखेर " मी घरीं जातों " असा रोहिणकर-साठीं कारकुनाजवळ निरोप ठेवून मी घरीं परतलों.

मी घरीं आलों, तेव्हां वहिनी व्हरांड्यांतच बसल्या होत्या. माझ्याबरोबरच्या मासिकांपैकीं एक त्यांच्या हातांत होतें.

मी वर चढल्याबरोबर मासिक टेबलावर ठेवून त्या आंत जाऊं लागल्या. मीं म्हटलें,

" बसा ना. मी आलों म्हणून उठायला नको. क्लबांत पत्ते-बित्ते खेळताहेत त्यांत मन लागेना, म्हणून निघून आलों मी. "

त्या परत बसल्या. मीही समोरच्या एका खुर्चीवर बसलों. थोडा वेळ कोणीच कांहीं बोललें नाहीं. वहिनी टेबलावरच्या मासिकाशीं चाळा करीत होत्या. कांहींतरी बोलावें म्हणून मीं म्हटलें,

" इथें पुस्तकं—बिस्तकं मिळतात का तुम्हांला हवींत तीं ? "

आणि असें म्हणतां म्हणतांच सहज म्हणून टेबलावरचें मासिक घेण्यासाठीं मीं हात पुढें केला, तो वहिनींच्या हाताला लागला. त्याबरोबर मला अगदीं शरमल्यासारखें झालें, बावळ्यासारखें वाटूं लागलें. त्याही गोंधळल्यासारख्या दिसल्या. तेवढा क्षण किती मोठा आणि किती अवघड वाटला !

मीं कसातरी हात मागें घेतला आणि समोर कुठें तरी पाहूं लागलों.

आपण कांहीं तरी बोलणें काढून हा अवघडपणा नाहींसा करावा असें मला वाटूं लागलें होतें, तोंच

" शरच्चंद्रांच्यासारखी एकही कादंबरी आपल्याकडे लिहिली गेली नाहीं, नाहीं का ? असं कां असावं ? "

असा प्रश्न वहिनींनीं विचारला. मीं त्यांच्याकडे पाहिलें. त्यांची मुद्रा पुन्हा पूर्वीसारखी प्रसन्न दिसत होती. त्यांचा तो संयम आणि ती समयज्ञता पाहून मला त्यांच्याबद्दल अधिकच कौतुक वाटूं लागलें. माझ्याही मनावरचें दडपण जाऊन मला हलकें वाटलें. आमचें संभाषण पुन्हा चालू झालें. केतकर, वामनराव, हरिभाऊ, खांडेकर अशा एकामागून एक अनेक लेखकांसंबंधीं आम्ही बोलत राहिलों. वहिनींची अभिरुचि सुसंस्कृत आणि वाचन डोळस आणि सूक्ष्म होतें असें मला दिसून आलें.

" तुमची ह्या आडगांवांत बरीच कुचंबणा होत असेल नाहीं ? " मीं म्हटलें, " त्यांतून रोहिणकरला वाङ्मयाची आवड असती, तर तुम्हांला इतकं ..."

" त्यांना ? त्यांना वाङ्मयावर बोललेलंसुद्धा आवडत नाहीं. वेळ घालवणं वाटतं त्यांना तें. घरीं भाऊ होते, मैत्रिणी होत्या, त्यांच्याशीं गप्पा मारायला मिळत. इथें अगदीं गोष्ट काढूं नका....अग बाई, आठ वाजले वाटतं... "

मध्येंच एकदम त्या चमकून म्हणाल्या. टोले आठाचेच पडत होते.

"...आत्तां येतील हे आणि आपण आपलीं वाङ्मय बोलत बसलों ! "

हें वाक्य संपवून त्या आंत जायला निघणार, तोंच अंगणाचें फाटक वाजलें आणि रोहिणकर आलाच. पायऱ्या चढतां चढतांच तो म्हणाला.

" अरे, क्लबांतून आलास तो वाङ्मय बोलायला वाटतं ? कसे तुम्ही तासन् तास वाङ्मय बोलत बसतां, कळत नाहीं बुवा आपल्याला ! "

त्याचें बोलणें चालू असतांनाच वहिनी आंत गेल्या होत्या. रोहिणकरही आंत गेला. मी खालीं उतरून बागेंत गेलों.

थोड्या वेळानें साहित्य–सभेचे, यायचे होते ते लोक आले. त्यांचा माझा परिचय झाला. थोडींशीं प्रश्नोत्तरें झालीं आणि दुसऱ्या दिवशीं सकाळचा कार्यक्रम नक्की झाला.

रात्रीं निजतांना मी अगदीं विमनस्क झालों होतों. दुसऱ्या दिवशीं बोलायचें होतें, त्यावर पडल्या पडल्या विचार करूं लागलों. पण विचारांचा क्रम लावण्याऐवजीं संध्याकाळीं चहाच्या वेळेपासूनचे सगळे प्रसंग उलटसुलट क्रमानें मध्यें घुसूं लागले आणि त्यांच्या त्या विसंगत जीवनाचीं चित्रें डोळ्यांपुढें येऊं लागलीं.

समारंभ झाला. भाषण बरें झालें असावें, असें मला वाटलें. नंतर कांहीं प्रश्नोत्तरें झालीं. आभार झाले, अभिनंदनें झालीं आणि समारंभ आटोपला.

आम्ही तिघें घरीं येत होतों. रोहिणकर सारखा चार पावलें मागें किंवा पुढें असे. तो मुद्दामच तसा राहात होता कीं काय अशी मला शंका आली. म्हणून मी त्याच्याशीं बोलायचा विचार करून त्याच्या जवळ जाऊं लागलों. तेवढ्यांत वहिनींनीं मला कांहीं तरी प्रश्न विचारला.

" चालूं द्या ! तुमचं वाङ्मय पुरं होऊं द्या ! " तो म्हणाला. तो खूपच रागावलेला असावा आणि प्रयत्नानें स्वतःला आवरीत असावा, असें मला वाटलें.

" आज काय झालं आहे तुम्हांला ? असं काय करतांहां तुम्ही ? " वहिनी त्याच्याजवळ जात म्हणाल्या.

" मला कांहीं झालं नाहीं. तुलाच कांहीं तरी झालेलं दिसतंय्. मघांशीं मुन्सफसाहेबांशीं ओळख करून देण्यासाठीं

मी तुला दोन–तीनदा ‘शुक शुक’ करून, खुणा करून, बोलवलं. पण तुम्ही, आणि ते सेक्रेटरी आणि ते, वाङ्मयांत मश्गूल! तुम्हांला दाद कुठें आहे जगाची?”

“खरंच, माझ्या लक्षांत नाहीं आलं. आपण केव्हां तरी मुद्दाम त्यांच्या घरीं जाऊन त्यांची ओळख करून घेऊं. हं?”

“हो. बरोबर आहे. मुन्सफ इथेंच आहेत. पुन्हा केव्हांही भेटतील. वाङ्मय पुन्हा भेटायचं नाहीं.” तो दुखावून पण हेटाळणीच्या स्वरानें म्हणाला.

“उगीच कांहीं तरी हें करूं नका!”

मला त्यांचें बोलणें ऐकूं येत होतें. मला अगदीं अस्वस्थ वाटूं लागलें.

मी आणखी त्याच्याकडे राहिलों, तर एखादा प्रचंड उत्पातच झाल्यावांचून राहाणार नाहीं, अशी माझी खात्री झाली.

त्यानंतर कोणी कांहीं बोललें नाहीं आणि थोड्याच वेळानें घरही आलें.

* * *

दुपारचें जेवण अगदीं मुकाट्यानें चाललें होतें. वहिनीही फारशा बाहेर येत नव्हत्या. काय बोलावें, मला सुचत नव्हतें. सकाळच्या सभेचा विषय अगदीं सगळ्यांत वर होता. पण सभेनंतरच्या रस्त्यांतल्या त्या प्रकारानंतर त्यासंबंधीं बोलणें शक्यच नव्हतें. शिवाय तो विषय वाङ्मयाचाच. त्यांच्या गांवापासून दोन-अडीच कोसांवर डोंगरांत कांहीं लेणीं होतीं, तीं पाहायला जावें असा आधीं माझा विचार होता. पण आतां त्यांचा मागमूसही माझ्या मनांत राहिला नव्हता. त्यासंबंधीं कांहीं माहिती विचारली असती, पण तोही विषय पुन्हा मूर्तिकला, चित्रकला, असा ललित जातींतला व्हायचा; म्हणून त्यासंबंधीं बोलायचा मला धीर झाला नाहीं. त्याच्या

व्यवसायासंबंधीं बोलावें तर मला त्यांत कांहीं कळत नव्हतें. आणखी एकंदरींतच कोणीं कोणाशीं बोलावें अशी मनस्थिति नव्हती.

जेवण आटपत आलें होतें. वहिनी ताक वाढायला आल्या होत्या.

" आज जाईन म्हणतों मी. " मीं म्हटलें.

" कां रे ? घाई काय आहे ? राहा आल्यासारखा आणखी चार दिवस. "

" नको. जातों झालं. "

" पाहा बुवा. तुझ्या सोयीप्रमाणें. "

" जातोंच. "

" ऐकलं का ? हा जातोंच म्हणतोय्. बरोबर फराळाचं द्यायची व्यवस्था करा. "

म्हणजे मीं जायला रोहिणकरची हरकत नव्हती. निदान जास्त आग्रह केला नाहीं त्यानें राहायचा.

वहिनींचें उत्तर आलें नाहीं. तो पुन्हा मोठ्यानें म्हणाला,

" ऐकलं ना ? "

त्या दाराशीं आल्या होत्या. म्हणाल्या,

" ऐकलं. "

मीं म्हटलें, " फराळाची कांहीं जरूर नाहीं. सकाळला पोचतों मी मुंबईला. शिवाय गाडींत मी कधीं कांहीं खात नाहीं. "

" नॉन्सेन्स ! प्रवासांत खाण्याची कधीं आबाळ करूं नये. अन् शिवाय कुणीही जायचं असलं तरी बरोबर घरचं फराळाचं दिलं पाहिजे, असा माझा नियम आहे. "

एवढें बोलून तो आंचवायला उठला. पुन्हा त्याचा तो नियम पुढें आला होता. मीं वहिनींकडे पाहिलें. त्यांचा चेहेरा गंभीर दिसत होता. माझ्या मनांत आलें, ' रोहिणकरच्या ह्या

नियमांच्या, तत्त्वांच्या आणि शिस्तीच्या दगडांवर त्यांचं मन किती ठेचाळत असेल ?"

* * *

स्टेशनवर गाडीसाठीं फार वेळ तिष्ठावें लागलें नाहीं. रोहिणकरनें चांगली जागा पाहून देऊन मला बसवलें आणि गाडी हलूं लागतांच माझा निरोप घेतला.

गाडी चालू झाली. रोहिणकरची रुंद भरदार पाठ स्टेशनच्या दाराबाहेर गेली. घरून निघायच्या वेळीं रोहिणकर आणि मी टांग्यांत चढलों होतों. वहिनी व्हरांड्यांत उभ्या होत्या. व्यवस्थित कापलेल्या मेंदीच्या कांटेरी कुंपणामागें त्यांची ती किंचित् स्थूल आकृति दिसत होती, ती टांगा कोपऱ्यावर वळेपर्यंत.

त्या दीड दिवसांतल्या आठवणी भरतीच्या लाटांप्रमाणें माझ्या मनांत एकी मागून एक येऊं लागल्या. त्यांत मध्येंच एका ठिकाणीं रोहिणकरच्या मनाचा प्रचंड खडक उभा होता आणि त्यावर वहिनींचें मन असहाय्य धडक घेतांना दिसत होतें.

# खरें आणि खोटें

थोडा वेळ तो तसाच तिच्याकडे पाहात राहिला. तो तिला जवळ जवळ दोन वर्षांनीं भेटत होता. खरेंच तिच्यांत फरक पडला होता. तशी ती मोठी सशक्त आणि रसरशीत केव्हांच नव्हती; पण आतां, आंतली हवा जाऊं लागली म्हणजे रबरी फुगा जसा सुरकुतलेला आणि ओढल्यासारखा दिसतो, तशी ती दिसत होती. आधींच सांवळा रंग, त्यांत आतां डोळ्यांभोवतीं काळ्या कडा आलेल्या, त्यामुळें तिच्या चर्येला एक प्रकारचा भकासपणा आला होता. डोळ्यांचा मूळचा आकार चांगला, पण आतां ते अगदीं निस्तेज झाले होते. बोलतांना मध्येंच खुदकन् हसण्याची तिची पूर्वीची लकब अजूनही तशीच होती; पण त्या हसण्यांत आतां शीण आणि निर्जीवपणा दिसत होता. त्यामुळें तें आकर्षक वाटण्याऐवजीं पोकळ वाटत होतें. तिचा नवरा, म्हणजेच आजचा सुप्रसिद्ध कवि, गायक आणि संगीतदिग्दर्शक बी. मधुकर, तिला नीट वागवीत नाहीं, असें

जें त्यानें ऐकलें होतें, तें खोटें नाहीं याबद्दल तिच्याकडे पाहिल्यावर त्याला शंका उरली नाहीं, आणि कॉलेजांतल्या आपल्या जुन्या स्नेहाच्या जोरावर आपण आज तिला धीर देण्यासाठीं इकडे येण्याचा विचार केला, ह्याबद्दलही त्याला मनांतल्या मनांत संतोष वाटला. पण आपल्याला पाहिल्या-बरोबर ती मुसमुसून रडत आपल्या वैवाहिक दुःखाची कहाणी सांगेल अशी जी खूणगांठ त्यानें येण्यापूर्वी मनाशीं बांधून ठेवली होती, ती खोटी ठरल्यामुळें तो थोडासा खट्टू झाला. आपण मोठ्या उत्सुकतेनें तिला धीर देण्यासाठीं आलों असतांना, तिनें मात्र मधल्या वर्षांचा तिऱ्हाइतपणाचा पडदा मध्यें उभा करावा, हें त्याला बरें वाटलें नाहीं.

खुर्चीतल्या खुर्चीत ह्या मांडीवरचा त्या मांडीवर होऊन, कांहीं तरी बोललें पाहिजे म्हणून तो म्हणाला,

"सुलु, आज मी तुझ्याकडे मुद्दाम आलोंय्."

"होय?"

"मी तुझ्या–तुमच्या संसारासंबंधीं अगदीं अस्वस्थ करणाऱ्या बातम्या ऐकल्या आहेत."

"म्हणजे?"

"हें पाहा सुलु, असं वेड पांघरण्याचं कारण नाहीं. आपले कॉलेजांतले दिवस तूं विसरली नसशील. माझं तुझ्यावर प्रेम होतं. तूं बापूशीं लग्न केलंस. पण तें जाऊं दे. मला एवढंच सांगायचं आहे कीं आजही माझ्या मनांत तुझ्याबद्दल पूर्वीचीच भावना आहे आणि म्हणूनच मी तुला धीर द्यायला, मदत करायला आलों आहें."

"मला मदत करायला? आणि हें काय आणलं आहेस? हा डबा कसला?"

"हें पातळ आणलं आहे रेशमी. तुला रंग शोभेल."

" पण कशाला आणलंस हें? माझ्याजवळ कितीतरी आहेत. कधीं नेसायचीं तेंच कळत नाहीं!"

" ठेव पण. आणि मी नेऊन काय करणार? I have no one else to give it to! तें जाऊं दे. मी आलों होतों अशासाठीं..."

" हो. तें सांगायचं राहिलंच..."

" तेंच सांगतों. तुझा संसार विशेष सुखाचा नाहीं, असं मी ऐकत होतों, तें खरं आहे, हें आतां मला कळलं. तुझ्या चेहेऱ्यावर तें अगदीं लिहिल्यासारखं स्वच्छ दिसतंय्. बापूबरोबर तुझा संसार सुखाचा होईल असं मला तूं लग्न केलंस तेव्हांही वाटलं नव्हतंच, पण माझी भीति इतक्या लवकर आणि इतक्या प्रमाणांत खरी होईल असं मात्र वाटलं नव्हतं."

" म्हणजे काय?"

" म्हणजे काय? तुला माहीत आहे? हल्लीं बापूचं चरित्र म्हणजे गांवांतल्या सर्व सुशिक्षितांच्या चर्चेचा विषय झाला आहे. आधींच कॉलेजांत नांव कमावलं होतं; त्यांत आतां तर तो सिनेमाच्या धंद्यांत पडला आहे; हल्लीं तो दारू पितो; नट्यांबरोबर हवा तसा वागतो; ती मिस् सुषमा कीं फिषमा तिला बरोबर घेऊन, आज जुहू, उद्यां वेसावा, परवां घोडबंदर असा मोटरींतून जातो; त्यानें तुझी अगदीं हेळसांड चालवली आहे; आणि कधीं कधीं तो दोन दोन दिवस घरींही येत नाहीं...अशा एक ना दोन, शेंकडोशें गोष्टी लोक बोलताहेत. मला त्या ऐकवत नाहींत. मला पूर्वींचे आपले कॉलेजांतले दिवस आठवतात आणि वाटतं, ह्या असल्या माणसाबरोबर..."

" कुणीं सांगितलं तुला हें सगळं?"

" कुणी कां सांगेना? पण खरं आहे कीं नाहीं? आणि ...आणि तुला सांगायला हरकत नाहीं, लोकं तर सगळीं बोलतातच आहेत, पण मला एका त्याच्या स्टूडिओंतल्या

...११३

माणसाकडूनच्च कळलं आहे कीं एकदा तो तिला घेऊन इथें आला होता नि तुला माहेरीं जावं लागलं."

"आणि असल्या माणसांच्या बोलण्यावर तूं विश्वास ठेवतोस? धंद्यामध्यें एकमेकांचं वाईट पाहाणारे पुष्कळ असतात, हें तुला कळायला पाहिजे."

"खोटं आहे का मी म्हणतों तें? त्या सुषमाला घेऊन तो रात्रीं इथें आला नव्हता एकदा?"

"आली होती ती हें खरं; पण मी कांहीं माहेरीं गेलें नव्हतें, ती आली म्हणून."

"बरं. तो दारू पीत नाहीं?"

"हें पाहा बाळू, तुला माहीतच आहे कीं ह्यांना कसलंसुद्धा, सुपारी–सिगरेटचंसुद्धा, व्यसन नाहीं. पण ते कधीं कधीं घेतात हें मला ठाऊक आहे आणि तुलाही ठाऊक आहे. कॉलेजांत असतांनाही एखादे वेळीं घेत असतच. नि तूं नाहीं घेतलीस त्यांच्याचबरोबर किती तरी वेळां?"

"मग तुझं म्हणणं कीं तूं एकंदरींत सुखी आहेस. त्याचं तुझ्यावर मनापासून प्रेम आहे. नि लोकं सगळीं बोलताहेत त्यांत कांहीं खरं नाहीं."

"लोकं काय बोलतात तें मला काय माहीत?"

"तुझ्या तोंडावर कोण बोलणार आहे?"

"तेंही खरंच ... पण तुला माहीतच आहे, सिनेमाचा धंदा कसा असतो तें. त्यांत रात्रीचा दिवस आणि दिवसाची रात्र हीं कधीं कधीं व्हायचींच. पण ते घरीं आलेच नाहींत, असं कधीं झालं नाहीं."

"एकदासुद्धा?"

"तूं माझी अशी उलट तपासणी करूं नको."

"राहिलं. एकंदरींत तूं सुखी आहेस ना? मग माझाच्च कांहीं गैरसमज झाला होता लोकांचीं बोलणीं ऐकून, असंच म्हटलं पाहिजे. असो."

ती कांहीं बोलली नाहीं. मग जरा थांबून म्हणाली,

“ मी तुझ्यासाठीं कांहीं तरी आणतें. जरा बैस.”

“ मला चहाबिहा कांहीं नको. ”

“ असं कसं होईल ? माझ्याकडे लग्नानंतर आज पहिल्यांदा आलास तूं. जरा बैस. ”

असें बोलून ती आंत गेलीच.

ती आंत गेली, ती त्याच्यासाठीं चहा-कॉफी आणायला, हें तर खरेंच, पण त्याच्या प्रश्नांनीं ती थोडीबहुत भांबावून गेली होती, हेंही खोटें नाहीं. त्यानें तिला एक कोडेंच घातलें होतें आणि तें तिलाही कोडेंच होतें. आपण सुखी आहों कीं नाहीं, ह्याचा तिचा तिलाही केव्हां केव्हां संभ्रम पडे. बाळूच्या प्रश्नामुळें तिच्या मनापुढें पूर्वीचे दिवस पुन्हा उभे राहिले, एवढेंच.

त्यांचें लग्न झालें तेव्हां थोडासा कल्लोळच उडाला होता. कारण दोन्ही घरच्या माणसांचा लग्नाला विरोध होता. त्याच्या लोकांच्या मतें तिचें घराणें त्यांच्या तोलाचें नव्हतें आणि तिच्या आईवडिलांना त्याचा कॉलेजांतला लौकिक पसंत नव्हता. त्यांना वाटे कीं तिला त्याच्यापासून सुख व्हायचें नाहीं. कॉलेजांतल्या त्याच्या लौकिकासंबंधीं त्यांचें जें मत झालें होतें, तें अगदींच निराधार नव्हतें. श्रीमंत, सुस्वरूप, लाघवी, हजरजबाबी, रसिक आणि रंगेल असल्यामुळें पांचसात तरी मुली नेहमीं त्याच्याभोवतीं असायच्याच; त्यामुळें इतर मुलांनीं त्याला ‘ गोकुळचा कान्हा ’ असें नांव दिलें होतें ! आणि तें तो भूषण मानीत असे. सुलोचनाही त्याचें कौतुक करणाऱ्या मुलींपैकींच होती; पण इतर मुलींचा गराडा फोडून तिला त्याच्या फार जवळ जातां येत नसे. कारण तिला इतर मुलींच्या मानानें रूप नव्हतें, नखरा मुळींच नव्हता आणि इतरांना ढुशी देऊन आपण पुढें घुसायचें, हा गुण तर त्याहूनही नव्हता. पण तिच्या ह्या गुणामुळेंच कीं काय, इतर

श्रीमंत आणि रूपसंपन्न मुली, त्यांच्या वडिलांनीं आणलेल्या अधिक श्रीमंत स्थळीं मुकाट्यानें जाऊन पडल्यानें, त्याचें सुलोचनेकडे लक्ष वेधलें आणि त्यांचें परस्पर सख्य वाढलें. तरुण वयांत, वडील माणसांचा विरोध आणि चौकस लोकांनीं पसरविलेले प्रवाद, प्रेमाचीं अनिश्चित आणि शिथिल बंधनें पक्कीं करण्याला साहाय्यक होतात. तसेंच त्यांच्याही बाबतींत झालें आणि अखेर तिनें आपल्या गोड स्वभावानें आणि सरळ अंतःकरणानेंच त्याला जिंकलें.

पण त्याला जिंकणें जितकें सोपें गेलें, तितकें त्याला धरून ठेवणें सोपें नाहीं, हें तिला हळुहळू दिसूं लागलें. म्हणजे तो तिला वाईट वागवूं लागला असें नाहीं; पण आपला नवरा आपल्याशीं कसा वागतो हें बायकांना चटकन् जाणवतें, तसें तें तिला जाणवलें. कुठें तरी कांहीं तरी फरक पडत चालला. पहिले कांहीं दिवस चांगले गेले; पण पुढें तो सिनेमा-धंद्यांत शिरला, तेव्हां विशेष फरक पडला. त्याच्या आयुष्यांतल्या पहिल्या स्थानावरून आपण घसरत चाललों आहों, असें तिला वाटूं लागलें. त्यामुळें स्वाभाविकच ती त्याच्याशीं आंखडल्यासारखी वागे. पण तो पूर्णपणें दुरावला नव्हता; इतकेंच नव्हे, तर एखाद्या दिवशीं आपलें कांहीं चुकलें असें त्याला वाटलें, तर तो तिला खूष करण्याचा विशेष प्रयत्न करी. असा हा पाठशिवणीचा खेळ गेलीं तीन चार वर्षें चालला होता. ती अल्पसंतुष्ट होती. तिची भूक थोडी होती. तो एक गोड शब्द बोलला तरी तो तिला कितीतरी दिवस पुरत असे. त्याचें तसें नव्हतें. पांच सात सुंदर मुलींच्या घोळक्यांत असावें, त्यांनीं आपलें कौतुक करावें, आपणही त्यांची उगीचच थट्टा करावी, ह्याची त्याला कॉलेजच्या जीवनांत गोडी लागली होती, ती कायम होती आणि सिनेमाच्या धंद्यांत त्याला हवें तसें वातावरण मिळालें होतें. पण सुलोचनेला ह्या गोष्टीचें कधीं वैषम्य वाटत नसे. जोंपर्यंत

तो आपल्याशीं एकनिष्ठ आहे, तोंपर्यंत आपल्याला काळजीचें कारण नाहीं, अशीच तिची भावना होती. आणि जरी तो मधून मधून वारा प्यायल्याप्रमाणें वागत असला, तरी फिरून तिच्याकडेच येत नव्हता का ? एक मात्र खरें कीं घरचें जीवन त्याला अपुरें वाटत होतें, तें त्याला पूर्ण समाधान देऊं शकत नव्हतें, हें तिला दिसत होतें. त्याला बांधून ठेवण्याचे तिचे प्रयत्न तोकडे पडत, ते त्याला दिसत; त्याला तिची कींव येई आणि तो मग तिला खूष करण्याचा प्रयत्न करी.

आपण दुःखी आहोंत असें म्हणायला तिला जागा नव्हती; कारण, खरोखर तो तिची हेळसांड करीत नव्हता. पण सुखी आहों असें म्हणावें तर संसारांत पूर्वीची खुमारी राहिलेली नव्हती. चावलेला चोथा पुन्हा चावून त्यांतून रस काढण्याचा प्रयत्न निष्फळ ठरत होता.

लोक काय बोलत असतात, तें तिला कळत नव्हतें. कोणी असें बोलत असतील, असें तिला वाटतही नव्हतें; कारण विशेष कुठें जावें–बसावें असा तिचा स्वभाव नव्हता आणि तशी तिला सवयही नव्हती. म्हणूनच आतां बाळूनें हा प्रश्न काढल्यावर ती भांबावून गेली होती. तिच्या बरोबरीच्या अधिक श्रीमंत घरीं पडलेल्या मुलींच्या संसारांचा ती विचार करूं लागली, तेव्हां त्यांचेही संसार बाहेरून जितके झगझगीत दिसतात तितके आंतून नसतात असेंच तिला दिसून आलें होतें; त्यामुळें संसारापासून अधिक निर्भेळ सुखाची अपेक्षाच करूं नये असा तिचा कल होत चालला होता.

ती एका तबकांत कॉफी आणि फराळाचें घेऊन आली आणि तबक टेबलावर ठेवीत म्हणाली,

"हं. चल."

तो भिंतीवरचीं चित्रें पाहात होता. त्यांत बापूचे आणि सुलोचनेचे लग्नानंतरचे कांहीं फोटो होते. कांहीं नटींचे फोटो होते.

गांधी आणि टागोर ह्यांचेही दोन सुंदर फोटो होते. टागोरांबद्दल बापूला विशेष आकर्षण असे. टागोरांची 'गीतांजलि' त्याला सगळी पाठ होती आणि कॉलेजांत कांहीं दिवस तो बंगाल्यासारखाच रेशमी सदरा आणि पोकळ काष्ट्याचें धोतर असा पोषाख करीत असे, तेंही बाळूला आठवलें. त्या-बरोबरच त्या स्वभावांतल्या पोषाखीपणाची–नटवेपणाची देखील त्याला आठवण झाली. 'हं. चल' हे सुलोचनेचे शब्द ऐकून तो जागेवर येऊन बसला.

"तुझ्या प्रश्नाचं उत्तर मी देतें." ती म्हणाली.

"आंतून फराळाच्या जिनसांबरोबर माझ्या प्रश्नाचं उत्तरही आणलंय्स वाटतं?"

"तसं म्हण. बाहेर लोक आमच्याबद्दल काय बोलतात, हें मला ठाऊक नव्हतं. त्यामुळें मी तुझं बोलणं ऐकून आधीं थोडीशी भांबावलें, हें खरं आहे. पण तूं लग्न केलं असतंस..."

"मीं कुणाशीं लग्न केलं असतं तें ठाऊक असून..."

"तें ठाऊक आहे तरी म्हणतें, तूं जर लग्न केलं असतंस तर तुलाही कळून आलं असतं कीं संसारसुखाचीं आपलीं पहिलीं जीं स्वप्नं असतात तीं पुढे फिकट पडतात, त्यांची झळक जाते, छटा बदलतात. पण म्हणजे आपल्याला सुख मिळतच नाहीं असं नाहीं आणि त्यांच्या कल्पनेप्रमाणे मी त्यांना सुख देऊं शकलें असेन, असं तरी कसं म्हणूं? त्यांचं माझ्यावरचं लक्ष कमी झालं असं नाहीं. उलट मीच थंडावलें आहे. मला आतां कांहींही अति झालं कीं सहन होत नाहीं. ह्यांना मी सारखी बरोबर इकडे तिकडे जायला हवी असतें. पण मला तें जमत नाहीं. त्यामुळें त्यांचाच उलट हिरमोड होतो! आणि आपली जुनी ओळख म्हणूनच मी तुला सांगतें, त्यामुळें आमची कधीं थोडीशी धुसफूस, कुरकुरही होते, नाहीं असं नाहीं. पण असं झालं म्हणजे ते मग येतांना

माझ्यासाठीं कांहीं तरी घेऊन येतात. एखादी वेणी म्हण, ब्रूच म्हण, पातळ म्हण, कांहीं तरी आणतील आणि नाहींच कांहीं आणलं, तर आल्यावर सारखं मला खूष करण्याचा प्रयत्न करतील. आतां आज ह्यांना यायला उशीर झाला आहे ना ? आतांच पाहाशील तूं..."

"मला त्याला भेटायची इच्छा नाहीं आणि मी इथें आलेला त्यानें पाहावं असंही मला वाटत नाहीं. बराच वेळ बसलों मी. जातों आतां. हें पातळ ठेव मात्र. मी आलों होतों एका विशेष हेतूनें..."

इतक्यांत दाराची घंटा वाजली. सुलोचनेनें जाऊन दार उघडलें, तों बापू आंत आला.

उत्कृष्ट शिलाईचा पोषाख गोरा रंग, किंचित् स्थूल होऊं लागलेली पण रुबाबदार अंगकाठी, रुंद कपाळ, त्यावर मागें वळवलेले केस आणि भेदक मादक डोळे...

पांच वर्षांत त्याच्यांत फरक पडला होता. तो अंगानें अधिक भरला होता. कॉलेजांत असतांनासुद्धा बाळूला बापूसमोर नेहमीं स्वतःबद्दल कमीपणा वाटत असे आणि सुलूचा आणि त्याचा जरी आधींपासूनचा फार स्नेह होता, तरी बापू आल्याबरोबर त्याला माघार घ्यावी लागली होती. आतांही बापू आल्याबरोबर त्याला स्वतःबद्दल कमीपणाचीच जाणीव झाली आणि तो थोडासा अस्वस्थ होऊन चुळबुळ करूं लागला.

"हॅलो, कोण बाळू काय ?" बापूनें पुढें होऊन त्याच्या पाठीवर थाप मारीत म्हटलें आणि शेकहॅण्डसाठीं हात पुढें केला. पण शेकहॅण्ड करण्यासाठीं न थांबतांच हॅट एका खुर्चीवर टाकून कोट सुलोचनेच्या हातीं देत तो पुढें बोलूं लागला,

"हं. काय? बऱ्याच वर्षांनीं दिसतोस? मला वाटतं, आमच्या घरीं तूं पहिल्यांदाच येतोहेस."

त्याचें तें मुद्दाम मोठ्यानें बोलणें, ते हावभाव, चेहेऱ्या-वरचा फुगीर तांबूसपणा आणि डोळ्यांतला तरळपणा ह्यांवरून तो आज घेऊन आला होता, हें उघड दिसत होतें. तो कांहीं तरी बोलणार होता, पण सुलोचना म्हणाली,

" हो. मुद्दाम भेटायला आला होता आणि त्यानें हें मला द्यायला आणलं आहे, पातळ. "

" पातळ द्यायला आणलं होतं होय ? हात् ! अरे, लग्नाच्या वेळीं तोंड नाहीं दाखवलंस नि आतां पांच वर्षांनीं मुद्दाम द्यायला आलास ? हात्. बुळ्या आहेस, बुळ्या. You have always been बुळ्या. अरे, आतां पातळ द्यायला कांहीं occasion आहे ? भाऊबिजेला घेऊन यायचं होतंस... ओ, पण मी विसरलों. तुझं सुलूवर प्रेम होतं नाहीं का...?

" आं ? काय म्हणालास ? तूं मुद्दाम भेटायला आला होतास नाहीं का ? हां. म्हणजे मी दारू पितों, नट्यांबरोबर मोटरींतून हिंडतों, रात्रीं घरीं यायला उशीर करतों, एकंदरींत हिच्यावर मी प्रेम करीत नाहीं अन् हिला सुख देत नाहीं, असं ऐकून तूं हिला save करायला, आपल्या पहिल्या, जुन्या, विटलेल्या प्रेमाला नवा रंग चढतो का पाहायला आला होतास ना ? "

" हेः ! हें कांहींतरी बोलतोहेस हं, बापू ! "

" अरे, कांहीं तरी कसं ? खरंच आहे तें. माझं हिच्यावर प्रेम नसलं, तर हिला 'सेव्ह' नको करायला ? पण काय रे, समजा, माझं हिच्यावर प्रेम नसलं तर तूं आतां काय करणार आहेस ? हिला घेऊन जाणार आहेस ? आणि ती येणार आहे ? काय सुलू ? माझं तुझ्यावर प्रेम नाहीं ? मी तुला सुख देत नाहीं ? "

असें म्हणून तिच्या हातांतला कोट घेऊन तो त्याचे खिसे चाचपूं लागला. शेवटीं आंतल्या खिशांतून त्यानें एक डबी काढली आणि ती उघडून सुलोचनेसमोर धरीत म्हणाला,

" हें बघ."

डबींत एक सुंदर पोवळ्यांचा ब्रूच होता. तो तिच्या पदरावर लावीत म्हणाला,

" कसा आहे? आवडला? नि ही सुरंगीची वेणी. अं हं, अं हं. मी तुझ्या डोक्यांत घालणार. बाळू, सांग आतां, माझं हिच्यावर प्रेम नाहीं? सुलू, माझं तुझ्यावर प्रेम नाहीं?"

बाळू अगदीं बेचैन झाला होता. त्याला आणखी एक क्षणभरही तिथें थांबवेना. तो उठून म्हणाला,

" जातों आतां. बराच वेळ बसलों. उशीर झाला."

" All right, good boy. Good night, good bye. मधून मधून येत जा. अफवांवर विश्वास ठेवूं नका, अफवा पसरवूं नका. काय सुलू? सुलू, मी आतां तुला डान्स शिकवणार आहें."

एव्हांना बापू दारापर्यंत गेला होता. त्याला तो पुन्हा म्हणाला,

" Cheerio! अरे, पण हें तुझं पातळ. . .बरं, बरं, असूं दे. नेसेल ती. I am not jealous. मी मत्सरी आहें, सुलू? मूर्ख आहे लेकाचा. त्याला काय वाटतं, माझं तुझ्यावर प्रेम नाहीं? झुरत बसलं म्हणजेच प्रेम असतं वाटतं? Idiot!"

एव्हांना खोलीबाहेर पडून बाळूनें दार ओढून घेतलें होतें. बापूचें मोठमोठ्यानें बोलणें, सुलूचें ' नको नको, हें काय हें!' असे कांहीं तरी उद्गार, मग त्यांचें दोघां मिळून हसणें, असें संमिश्रपणें त्याच्या कानांवर येत होतें. बापूच्या संसाराबद्दल आपण ऐकलें त्यांतलें खरें किती आणि खोटें किती ह्याचा त्याला निर्णय लागेना. तशा अनिश्चित स्थितींतच तो एक क्षणभर तिथें उभा राहिला आणि मग अनिश्चित पावलें टाकीत चालूं लागला.

# तिचें सुख

सुहासिनीच्या सुखाचें माप अगदीं कांठोकांठ भरलें होतें. त्यांत आणखी सुख मावायला कणभर देखील जागा नव्हती. आणि तसें कां होऊं नये? तिला चांगला रुबाबदार, कर्तबगार, श्रीमंत नवरा मिळाला होता. चार लोकांत त्याच्या बोलण्या-चालण्याची कशी छाप पडते ते ती पाहात होती. आपलें मत लोकांच्या गळीं नेटानें पण आर्जवानें कसें उतरवावें हें त्याच्या-सारखें फारच थोड्यांना साधत असेल. प्रेम आणि अधिकार, दृढता आणि मृदुता, संयम आणि बेछूटपणा, जुन्याबद्दल आदर आणि नव्याबद्दल उत्साह, ह्यांचा असा कांहीं मजेदार मिलाफ त्याच्या ठिकाणीं झाला होता कीं, त्याच्याशीं आपलें लग्न झालें ह्यापेक्षां अधिक भाग्याची गोष्ट आपल्या आयुष्यांत घडणें शक्य नव्हतें असें साहजिकच तिला वाटूं लागलें. आणि तिला तसें वाटावें असेंच सुरेशचें आतांपर्यंतचें चरित्र होतें.

प्रोफेसरीच्या धंद्यांत मिळून मिळून पैसा किती मिळणार? आयुष्याच्या शेवटीं दरमहा तीनशें, फार तर साडेतीनशे. असलें घाण्याच्या बैलाचें, मरतुकडें, पोकळ प्रतिष्ठेचें जिणें जगण्यापेक्षां कांहीं तरी स्वतंत्र धंदा करून आपली कर्तबगारी गाजवावी अशा विचारानें त्यानें प्रोफेसरीवर लाथ मारली आणि स्वतंत्र धंद्याला सुरुवात केली. ते युद्धाचे दिवस धंद्याला अनुकूलही होते. कचरा देखील व्यवस्थित धोरणानें विकला तर त्याच्या बदली सोनें पदरांत पडत होतें. त्यानें पहिल्यानें सैन्याला लोणचीं–पापड पुरवण्याचें कंत्राट घेतलें. त्यांत किफायत झाल्यावर पुढें सुकवलेल्या भाज्या पुरवायला आरंभ केला. त्या निमित्तानें भाजी–बाजाराशीं त्याचा जो संबंध आला त्यांतून पुढें त्यानें सैन्याला बटाटे पुरवायला सुरुवात केली. मात्र एका पोत्यांत तीस टक्क्यांपेक्षां अधिक सडके बटाटे घालायचे नाहींत हें तत्त्व त्यानें ठरवून टाकलें होतें आणि तें त्यानें कसोशीनें पाळलें. कारण धंदा नीट रीतीनें यशस्वीपणें करायचा तर कांहीं तत्त्वें ठरवून टाकलीं पाहिजेत हे त्याला पटलेलें होतें.

एवढ्या अवधींत त्याचे सरकारी अधिकाऱ्यांत जे लागेबांधे उत्पन्न झाले होते, तेच त्याला आयात-परवाने मिळवायला उपयोगी पडले आणि त्यांच्या जोरावर त्यानें फायदेशीर व्यापार सुरू केला. त्यांत त्याला हजारांनीं फायदा झाला. युद्ध संपल्यानंतर केवळ डिस्पोझलच्या व्यवहारांत त्यानें लाखो रुपयांची उलाढाल केली.

पण आतां तो उलाढाल्या व्यापारी राहिला नव्हता. त्याचा व्याप वाढत चालला होता आणि जम बसत चालला होता. तो आतां छोटा कारखानदार झाला होता. कृत्रिम रेशमी कापडाचा त्याचा स्वतःचा कारखाना होता आणि शिवाय इतर चार–सहा कारखान्यांत त्याची दोन आण्यांपासून आठ आण्यांपर्यंत भागी होती.

ह्या त्याच्या चरित्राच्या मागले धागेदोरे लोकांना दिसले नाहींत, तरी पुढलें चित्र त्यांच्यासमोर होतें. वरातीपुढल्या बाणासारखी सरसर वर चढत जाणारी त्याची कर्तबगारी लोक पाहात होते. प्रोफेसरीवर लाथ मारून स्वतंत्र धंदा सुरू करतांना ज्याच्याजवळ एक सनप्रूफ गॅबरडीनचा सूट, दोन नेकटाय, आणि बोलण्या-चालण्याची आकर्षक ढब एवढेंच भांडवल लोकांना दिसत होतें, त्याच्याजवळ आज आठ-दहा वर्षांत, चालत्या धंद्यांतल्या भांडवलाखेरीज रोख लाख-पन्नास हजार रुपये सांठलेले होते. महाराष्ट्रीय मनुष्य देखील स्वतंत्र धंदा करून यशस्वी होऊं शकतो हें त्यानें दाखवून दिलें होतें आणि हें सगळें झालें तरी त्याचें वय तीस—बत्तीसच्या पुढें गेलें नव्हतें.

अशा कर्तबगार माणसाकडे समाजांतल्या कांहीं चौकस लोकांचें, विशेषतः मुलींच्या बापांचें आणि कांहीं मुलींचेंही, लक्ष वेधलें जावें ह्यांत नवल नाहीं. पण लग्नाच्या बाबतींतही सुरेशचीं कांहीं तत्त्वें होतीं. प्रेमाची महती त्याला कळत होती, पण त्यासंबंधीं त्याची दृष्टि वास्तववादी होती. बायको ही नुसती शेजेची सोबतीण नसून, आपल्या घराची घरधनीण, मुलांची आई आणि समाजांत बरोबर वागवण्याची एक दर्शनीय वस्तु असते हें त्याला बरोबर माहीत असल्यामुळें, आलेल्या मुलींतून काळजीपूर्वक परीक्षा करून आपल्या एकंदर आराखड्यांत बसेल अशा एका मुलीची त्यानें निवड केली, ती सुहासिनीची.

सुहासिनी साधारण गरीब घरची पण बी. ए. झालेली शिक्षिका होती. आणि नोकरी-व्यवसायांत शिरलेल्या कोणत्याही स्त्रीमधलें मार्दव कमी होऊन तिच्यांत एक निबरपणाची लकेर दिसूं लागते तसें सुहासिनीचेंही झाले होतें. पण त्याचें सुरेशला वैषम्य वाटलें नाहीं, इतकेंच नाहीं, तर व्यवहाराच्या दृष्टीनें एकंदरींत मार्दवापेक्षां थोडासा निबरपणाच

बरा असें त्याचें मत होतें. शिवाय तिचा तरतरीत, ईषद् आधुनिक नीटनेटकेपणा मनांत ठसण्यासारखा होता. आणखी म्हणजे लग्नापूर्वी त्यांची जी चारदोन वेळां भेट झाली... लग्न जरी पाहून पसंत करून ठरवलेलें असलें तरी प्रत्यक्ष लग्न होण्यापूर्वी नियोजित वधूवरांनीं एकमेकांना मधून मधून भेटणें बरें असें त्याचें मत होतें, त्यानुसार तो तिला अधून-मधून भेटत असे... त्या भेटींत त्याला जेव्हां दिसून आलें कीं आपण निवडलेली मुलगी धीट आहे; समाजांत वावरल्यानें तिला व्यवहारज्ञान आलें आहे; इतकेंच नव्हे, तर आपल्याला जशी आपल्या व्यवसायांत चढण्याची आकांक्षा आहे, तशीच तिलाही, लग्न झाल्यानंतर आठवड्याला अडीचशें वह्या तपासणें आणि तीस तास वर्ग शिकवणें असलें काम करण्यापेक्षां, स्त्रियांच्या चळवळींत पडून कांहींतरी कार्य करण्याची आकांक्षा आहे; तेव्हां तर त्यानें आपल्या निवडीच्या योग्यपणाबद्दल आपली पाठच थोपटून घेतली.

आपल्या बायकोनें स्त्रियांच्या चळवळींत भाग घेणें त्याला अगदीं पसंत होतें. स्त्रियांच्या चळवळींत भाग घेत असलें म्हणजे मोठमोठ्यांच्या बायकांच्या ओळखी होतात, हळुहळू त्यांच्याकडे जाणें-येणें वाढतें, त्यांतून त्यांच्या पुरुष मंडळीचा परिचय होण्याची शक्यता असते आणि त्यांतून व्यापार-धंद्याला साहाय्य होण्याचा संभव निर्माण होतो. इतका सगळा तपशीलवार विचार सुरेशच्या मनांत आला नसला तरी एकंदरींत आपण पसंत केलेली मुलगी आपल्याला योग्य निघणार ह्याचें त्याला समाधान वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

लग्न करून बायको घरांत आणायची, तर त्यापूर्वी घर चांगलें सुसज्ज आणि सुशोभित करून ठेवलेलें असलें पाहिजे, म्हणून त्यानें चांगल्यापैकीं, नवेंसें दिसणारें, पण सेकंडहँड फर्निचर विकत घेतलें. त्याचप्रमाणें खुर्च्या, कोचें, वगैरे

पाश्चात्य धर्तीचीं असलीं तरी त्यांत मधूनच कोठेंतरी भारतीय छटा दिसणें उच्च अभिरुचीचें लक्षण समजलें जातें असें त्यानें पाहिलें होतें, म्हणून त्यानें एक दोन मूर्ति आणि कांहीं बंगाली धर्तीच्या तसबिरीही ठेवल्या होत्या.

घरीं राहायला आल्यावर सुहासिनीला अगदीं प्रसन्न वाटलें. स्वयंपाकघर, न्हाणीघर, निजण्याची खोली, बसण्याची खोली ह्या सगळ्या ठिकाणीं सगळी व्यवस्था इतकी ठाकठीक होती कीं, सुरेशची दक्षता आणि बारीकसारीक गैरसोयी कोठें बोचूं नयेत ह्यासंबंधींची त्याची तत्परता पाहून तिचें हृदय त्याच्या संबंधींच्या कौतुकानें भरून आलें. निजायच्या खोलींत बिछान्यावर मऊ मऊ रबरी गाद्या उश्या होत्याच, पण तिला सबंध घरांतच आपण मऊ गाद्यांवर चालतों आहों, मऊ मऊ गाद्यांवर उठतों बसतों आहों असें वाटूं लागलें, इतकी ती सुखावली.

खरोखरच तिचें सुखाचें माप अगदीं कांठोकांठ भरलें होतें. त्यांत अधिक सुख मावायला कणभरदेखील जागा नव्हती. तिला हवें तें मिळत होतें, हवें तें करतां येत होतें, हवे तिथें जातां येत होतें. तिला दागिन्यांचा मोठा हव्यास होता असें नव्हे, पण त्यांतही तिची जी म्हणून हौस होती, ती भागत असे. आतां साखरेंतही गोडी कमी आहे असें म्हणायचें तर आपल्याला हिऱ्यांचीं कुडीं नाहींत ह्याचें तिला मधून मधून वाईट वाटे, हें खरें. तेंही इतके अगदीं स्वतःकरतां म्हणून नव्हे, पण ज्या बायकांत आपण जातों येतों, उठतों-बसतों, त्यांच्यांत व आपल्यांत फार फरक दिसूं नये असें साहजिकच कोणाही बाईला वाटतें, तसें तिला वाटत होतें, ह्यापलीकडे कांहीं नाहीं. पण ही जी थोडीशी उणीव तिला जाणवत होती तीही त्यांच्या लग्नानंतर दोन वर्षांनीं, लग्नाच्याच वाढदिवशीं भरून निघाली.

त्या दिवशीं संध्याकाळीं बाहेरून आल्यावर सुरेशनें तिच्या हातीं एक डबी दिली आणि म्हटलें, "उघडून बघ."

डबी उघडून पाहातांच तिचे डोळे आनंदाने आणि आश्चर्यानें चमकले.

"अय्या ! हिऱ्यांचीं कुडीं ?" ती म्हणाली आणि मग तिला काय वाटलें कोणाला ठाऊक, आपली उकळी जराशी दाबून तिनें विचारलें,

"एवढे पैसे कशाला खर्च केलेत आत्तां ? कितीचीं आहेत हीं ?"

"त्याच्याशीं तुला काय करायचं आहे ? तुला हिऱ्याचीं कुडीं नव्हतीं ना ? आपल्या बरोबरीच्या बायकांत जातांयेतांना कमीपणा वाटायचा तुला. आतां झालं कीं नाहीं ?"

"आत्तांच आणायची कांहीं जरूरी नव्हती पण... आणलीं असतीं."

"अग आणूं आणूं म्हणतांना दिवस चाललेच होते ना ? मलाही वाटत होतं, कीं तुला हिऱ्यांचीं कुडीं हवींत म्हणून. पण मी वाट पाहात होतों योग्य वेळेची. मग म्हटलं, तुला आपल्या लग्नाच्या वाढदिवशीं चकित करावं."

"भारीच हं मात्र तुमचं हें. इतकं करायला नको होतं कांहीं." असें म्हणून तिनें कौतुकानें आणि अभिमानानें डोळे भरून त्याच्याकडे पाहिलें.

"घाल पाहूं कशी दिसतात तीं."

"आत्तां कशाला ? घालतां येतील." ती कुड्यांकडे पुन्हा पुन्हा न्याहाळून पाहात म्हणाली.

"वा, असं कसं ? आज आपल्या लग्नाचा वाढदिवस. घाल. मला वाटतं, तुझ्या रंगाला आणि चेहेऱ्याला हिऱ्यांचीं कुडीं मोत्यांपेक्षां जास्त चांगलीं दिसतील. तसं म्हटलं तर सगळ्याच बायकांना कांहीं चांगलीं नाहीं दिसत हिऱ्यांचीं कुडीं. पण तुला छान दिसतील."

" पुरे पुरे." असें म्हणत तिनें मोत्यांचीं कुडीं काढून नवीं कुडीं कानांत घातलीं. तिला तीं खरोखरच चांगलीं दिसत होतीं. तो म्हणाला,

" खरंच छान दिसताहेत."

ती उठून आरशांत पाहायला निघाली.

उत्तम सुग्रास जेवण जरा अधिक झालें म्हणजे तें जसें डोळ्यांवर येतें आणि मग ते सुस्तावतात तशी सुहासिनीला आपल्या संसार–सुखाची तंद्री लागली आणि दिवसांमागून दिवस आणि महिन्यांमागून महिने कसे जात तें तिला कळलें नाहीं. आज बैठक आहे, उद्यां परिषद आहे, आज ह्यांच्याकडे पार्टीला जा, उद्यां त्यांना आपल्याकडे बोलाव, अशी त्यांच्या जीवनाचीं चाकें फिरत होतीं आणि त्यावर त्यांचा धावता प्रवास चालला होता.

* * *

अशीच एकदा ती आपल्या बांगड्यांचा घाट बदलून घेण्यासाठीं म्हणून आपल्या नेहमींच्या जवाहिऱ्याकडे गेली. कर्रर खड्–खट्ट् करून तिची गाडी उभी राहातांच दुकानाचा नोकर पुढें होऊन सलाम करून उभा राहिला आणि तिनें पुढें पाऊल टाकतांच शेठजीही तिला पाहून सामोरे आले.

आजूबाजूच्या कपाटांतल्या वस्तूंकडे पाहात पाहात जागेवर पोचल्यावर ती त्यांना बांगड्यांसंबंधीं काय सांगायचें तें सांगूं लागली. तेही तिच्या प्रश्नांना हो–नाहीं वगैरे उत्तरें देत होते. पण थोड्या वेळानें सुहासिनीच्या लक्षांत आलें कीं शेठजीचें लक्ष आपल्या बोलण्याकडे नसून कानांकडे आहे. मग तिला आठवलें, आपण आज हिऱ्यांचीं कुडीं घातलीं आहेत. मग तिचा सहजपणा जाऊन ती थोडी सांवरल्यासारखी झाली.

" नवीन घेतलेलीं दिसताहेत कुडीं." शेठजींनीं विचारलें.

ती कांहीं बोलण्यापूर्वींच शेठजी पुन्हा म्हणाले, " आमच्या-कडून नाहीं घेतलेलीं ! "

ती म्हणाली, " मला ठाऊक नाहीं. साहेबांनीं आणलीं आहेत."

" पण त्यांनीं कुठून घेतलीं ? "

" मीं विचारलं नाहीं त्यांना. तेही बोलले नाहींत. "

मग तिला काय वाटलें कोणाला ठाऊक, एक कुडें काढून शेठजींच्या हातांत देत तिनें विचारलें,

" कशीं आहेत ? "

शेठजींनीं कुडें हातांत घेऊन, एकदा लांबून आणि एकदा जवळून असें त्याच्याकडे पाहिलें, नंतर एक सूक्ष्मदर्शक भिंग मागवून घेऊन त्यांतून पुन्हा न्याहाळलें.

सुहासिनी अगदीं अनिमिष नेत्रांनीं त्यांच्याकडे पाहात होती. जणूं एखादा महत्त्वाचा, जीवाच्या मोलाचा, निर्णय ते देणार होते. भिंग बाजूला ठेवून आणि किंचित् नापसंती दर्शविणारा चेहेरा करून त्यांनीं कुडें तिच्या हातांत देत म्हटलें, " घ्या. "

त्यांचा तो चेहेरा पाहून सुहासिनी अगदीं अस्वस्थ झाली. कांहीं तरी कोठेंतरी बिघडलें आहे हें तिला दिसलें. शेठजींना कुडीं आवडलीं असतीं तर त्यांनीं तसें सांगितलें असतें, हें तिला अनुभवानें ठाऊक होतें. ते बोलले नाहींत, पण तिला उत्सुकता होती. ती म्हणाली,

" तुम्हीं सांगितलंत नाहींत कशीं आहेत कुडीं तें. कितीचीं असतील ? "

" सांगायला संकोच वाटतो. आतां तुम्ही विचारतां म्हणूनच सांगायचं....कुडीं बनावट आहेत. "

" काय म्हणतां ? खोटीं आहेत हीं ? खोटीं कशीं असतील ? साहेबांनीं इतकीं ह्यानें आणलीं ! "

“ मी उगीच कशाला सांगूं? कुडीं निखालस खोटीं आहेत. ऐशीं-शंभर रुपयांपर्यंत असतील फार तर. साहेबांना कुणींतरी फसवलं असेल.”

“ असे फसायचे नाहींत ते.”

असें ती बोलली खरी, पण तिचा चेहेरा पार उतरला आणि तिला अगदीं गळून गेल्यासारखें वाटूं लागलें. बांगड्यां-संबंधीं तिला जें कांहीं सांगायचें होतें, तें कसेंतरी शेठजींना सांगून ती घरीं परतली.

आपला नवरा कुड्यांच्या व्यवहारांत फसला असेल हें सुहासिनीला खरेंच वाटेना. कोणतीही वस्तु कसोशीनें चौकशी केल्यावांचून तो घेत नसे. हिऱ्यामोत्यांच्या पारखीबद्दल तर त्याला विशेष अभिमान होता. तो कुड्यांसारखी वस्तु भोळसटपणें कशी घेईल? मग काय त्यानें बुद्ध्याच तशीं कुडीं आणलीं असतील? त्याखेरीज दुसरा तर्कच संभवत नव्हता. त्याला स्पष्ट विचारून खरें खोटें करून घ्यावें असें तिच्या मनांत एकदा आलें; पण त्याला त्यासंबंधीं विचारायचें तरी कसें हें तिला कळेना. कारण त्याच्या वागण्यांत काडीमात्रही अंतर जाणवत नव्हतें. म्हणून मनांत असूनसुद्धा तिला विचारतां आलें नाहीं. मात्र तिच्या मनाला तें खात राहिलें.

* * *

त्या दिवशीं तिच्या सुखाचें भांडें लवंडलें आणि थेंबाथेंबाने पण झपाट्यानें रिकामें होत चाललें. तिच्या जीवनाचीं चाकें फिरत होतीं आणि त्यांवर तिचा प्रवास पूर्वीसारखाच चाललेला दिसत होता. पण त्यांतलें वंगण संपून त्यांत आतां घर्षणाची घरघर जाणवूं लागली होती. तिला सगळ्यांत राग आला, तो सुरेशनें खोटीं कुडीं आणलीं ह्यापेक्षां ती गोष्ट त्यानें आपल्याला सांगितली नाहीं ह्याचा. किंमतीसंबंधीं बोलणें निघूनसुद्धा त्यानें तिला कांहीं पत्ता लागूं दिला नव्हता ह्याचा. तीं कुडीं भारी किंमतीचीं आहेत ही बतावणी त्यानें

कायम ठेवली होती आणि मग तिला आपल्या नवऱ्याचें सगळेंच वागणें–बोलणें बेगडी आहे कीं काय अशी शंका येऊं लागली. त्याबरोबर आपल्या डोळ्यांवरचें पटल दूर झाल्यासारखें तिला वाटलें. तिनें गेल्या अडीच–तीन वर्षांतली आठवण करून पाहिली, तेव्हां तिला दिसलें कीं आपल्या नवऱ्याचें सगळें वागणें कांहीं तरी धोरणानें चालतें. त्यांत आंतून आलेल्या खऱ्या इच्छेपेक्षां हिशेब अधिक असतो. त्याचें प्रत्येक पाऊल म्हणजे पवित्रा असतो आणि तिला मग वाटलें, त्याचें व्यापारधंद्यांतलें यश त्यानें कदाचित् त्याच गुणानें मिळवलें असेल.

तिला आठवलें, लग्नानंतर तीं हनीमूनसाठीं उटकमंडला गेलीं होतीं; जातांनाच तो तिला म्हणाला होता, "आपण हनीमूनला जायचं तें नीलगिरींतल्या ह्या सुंदर ठिकाणीं, असं मीं मनाशीं ठरवून ठेवलं होतं. इतर सगळ्या ठिकाणांपेक्षां तें वेगळं वाटेल तुला. तूं कोणकोणतीं हिल्-स्टेशन्स पाहिलीं आहेस?" पण तिचें उत्तर ऐकायला न थांबतांच त्यानें उटकमंडची स्तुति पुढें चालू ठेवली होती. तिथल्या सर्वोत्कृष्ट निवासांतल्या अगदीं उत्तमपैकीं खोल्या त्यानें आधीं-पासून राखून ठेवल्या होत्या. तिथली ती राजेशाही व्यवस्था आणि टापटीप, दूध-मोगऱ्यासारख्या पांढऱ्या शुभ्र आणि पिसासारख्या मऊ गाद्या–उश्या, डोंगरी वातावरण, रमणीय निसर्ग-दृश्यें, निश्चिंत जीवन, ह्यांत तिथले त्यांचे पंधरा दिवस सुंदर स्वप्नासारखे गेले होते. पण त्या स्वप्नाबरोबरच तिथें कोइमतूरचा मोठा सूत-कारखानदार एन्. एन्. कनकप्पा चेट्टियार होता, ह्याचीही तिला आठवण झाली. त्याच्याशीं सुरेशनें विशेष सलगी ठेवली होती. आपल्याला सुंदर–सुंदर कपडे आणि दागिने घालायला लावून आपली त्याच्याशीं ओळख करून दिली होती. आपल्याला तो मनुष्य आवडला नव्हता, तरी सुरेशच्या हौशीखातर आपण त्याची ओळख

करून घेतली. उटकमंडहून तीं परत आलीं आणि सुरेशचा कोइमतूरशीं व्यापार-व्यवहार सुरू झाला.

तसेंच लग्नाच्या पहिल्या वाढदिवसासाठीं त्यानें तिला अबूला नेलें. तो म्हणाला होता, तुला देलवाड्याचीं मंदिरें खूप आवडतील. तिलाही नवीन ठिकाण पाहाण्याची हौस होतीच.

राजपुताना हॉटेलांत मुक्काम, सकाळीं नखीतलावाभोवतीं घोड्यावरून रपेट, दुपारीं देलवाड्याच्या मंदिराच्या आंतलें सुंदर, थक्क करणारें आरस पानांतलें कोरीव काम पाहातां-पाहातां गार विश्रांति, संध्याकाळीं सन्सेट्–पॉइंटला, नाहींतर दुसऱ्या कोठें तरी भटकायला. पण आतां तिला आठवलें, तिथेंही त्याचें लक्ष राजपुतान्यांतल्या पोलिटिकल खात्याचे बडे बडे अधिकारी आणि मोठे लोक ह्यांच्या ओळखी करून घ्यायच्या आणि आपल्याही करून द्यायच्या इकडे होतें.

ह्या सगळ्या ओळखी त्या त्या वेळीं अगदीं सलगीच्या, उत्स्फूर्त वाटत, पण पुढें त्यांचा रंग फिका होई. कित्येक गळून जात, तर कित्येक आहेत कीं नाहींत ह्याची आठवणही राहात नसे. तिला मग आठवलें कीं त्याचे बहुतेक मित्र जेवणाच्या टेबलावरचे असत. त्यांत जिव्हाळ्याचा कोणीच दिसेना. मग तिच्या लक्षांत आलें कीं आपला नवरा आपल्याला इतक्या चैनींत ठेवतो, पण आपले पैशाचे व्यवहार किंवा आपली आर्थिक परिस्थिति काय आहे ह्याची कधीं त्यानें आपल्याला कल्पना दिली नाहीं. कधीं आपण त्यासंबंधीं बोलणें काढलें तर त्यानें उडवून लावावें आणि म्हणावें, " ह्या पैशाच्या भानगडींत बायकांनीं लक्ष घालूं नये. तुला कांहीं कमी नाहीं ना ? " मग तिला वाटलें, आपला हा थाटानें उभा दिसणारा संसार म्हणजे एक बिनपायांचा डोलाराच तर नसेल ! त्याबरोबर तिच्या मनाला चटका बसला. आपण दोन अडीच वर्षें ह्याच्याबरोबर संसार केला ! अगदीं सुखानें

संसार केला; पण आपलीं मनें कधीं एकमेकांपाशीं पूर्ण मोकळीं झालीं नाहींत. आपण सुखाचे वरवरचे पापुद्रे हाताळीत होतों; त्याच्या गाभ्यापर्यंत आपला हात कधींच पोचला नाहीं... आणि ह्या जाणीवेबरोबर तिला आपलें जीवन पोकळ वाटूं लागलें. त्यांत एक खोटेपणा दिसूं लागला.

तिच्यांत कांहीं तरी फरक पडत चालला आहे हें त्याला जाणवल्यावांचून राहिलें नाहीं. पण त्याचें कारण त्याच्या लक्षांत आलें नाहीं आणि तें कारण आपण असूं अशी तर त्याला पुसटही शंका आली नाहीं. दिवस तसेच सरत राहिले.

* * *

एक दिवस त्यानें आपल्या घरीं एका गृहस्थाला मेजवानी द्यायचें ठरवलें होतें. मेजवान्यांचे त्यानें कांहीं दर्जे ठरवले होते. ज्याला मेजवानी द्यायची त्याच्यावर आपली जशी छाप पडावी अशी त्याची इच्छा असेल त्याप्रमाणें त्याची सरबराई करायची असा त्याचा रिवाज असे. त्यासाठीं त्यानें भांड्यांचे, कपबश्यांचे वेगवेगळे सेट्स ठेवले होते.

"आजचं काम 'ए वन' पैकीं बरं कां" त्यानें सुहासिनीला सांगितलें, "सगळं अगदीं उत्कृष्ट आणि अप्-टु-डेट् पाहिजे. आणि तूंही आज तें परवां घेतलेलं नवं पातळ नेस आणि तीं हिऱ्यांचीं कुडीं घाल."

पूर्वी त्यानें अनेक वेळां अशा मेजवान्या दिल्या होत्या आणि त्यांसाठीं तिनें मनापासून सगळें केलें होतें आणि दरवेळीं त्याच्या इच्छेप्रमाणें ती सजत असे. पण आज ह्या वेळीं तिला एकदम वाटलें कीं ह्या मेजवान्यांच्या बतावणींत आपण मुळींच भाग घेऊं नये. त्याच्या सांगण्यावर ती कांहीं बोलली नाहीं. तिनें त्याच्या अपेक्षेप्रमाणें मेजवानीची सगळी तयारी ठेवली होती. त्यांत खोड ठेवायला त्याला बोटभरही जागा नव्हती; पण स्वतः तिनें आपल्या वेषभूषेंत मात्र रोजच्यापेक्षां रतीभरही फरक केला नव्हता. त्यामुळें तो

पाहुण्यांशीं जरी हसतमुखानें आणि दरबारी सौजन्यानें वागत होता, तरी आंतून तो अतिशय अस्वस्थ झाला होता. पोषाखासंबंधींच्या त्याच्या सूचनेची तिनें केलेली उपेक्षा अगदीं अनपेक्षित होती. त्याचा, नव्हे त्याच्या जीवनतत्त्व-ज्ञानाचा, तो उपमर्द होता.

त्याच्या पोटांत चाललेला क्षोभ सुहासिनीला कळत होता आणि पाहुणे जातांच त्याचा स्फोट होणार हें तिला स्पष्ट दिसत होतें. पण तिलाही त्याच्याशीं केव्हांतरी बोलणें व्हायला हवेंच होतें. आज तिनें त्याच्या सूचनेची उपेक्षा केली, ती सर्व परिस्थिति लक्षांत घेऊनच.

पाहुणे गेल्याबरोबर तो तिला म्हणाला, “ आज तुला बरं नाहीं का ? ” त्याचें बोलणें अगदीं सौम्य वाटलें, तरी त्याच्या-मागें ज्वालामुखी धुमसतो आहे हें तिला माहीत होतें. राग आला तरी वरपांगी सौम्य आणि आवाज न चढवतां बोलायचें ही त्याची लकब तिला परिचित होती.

“ कां ? कशावरून ? ” तिनें विचारलें.

“ आज तूं माझी अगदीं निराशा केलीस. ”

“ पाहुण्यांच्या सरबराईत कांहीं चुकलं का ? ” आपल्या हातून स्फोट होऊं नये म्हणून तीही संयमानें बोलत होती.

“ आज मीं तुला मुद्दाम चांगला पोषाख करायला सांगितलं होतं, तर तूं एखाद्या मोलकरणीसारखी पटकूर नेसून आणि लंकेची पार्वती होऊन बसली होतीस. ”

“ हें कांहीं पटकूर नाहीं. चांगलं लुगडं आहे इंदुरी. ”

“ पण मीं तुला तें नवं नेसायला सांगितलं होतं. आणि कुडीं कां नाहीं घातलींस ? ”

“ मला त्यांना दाखवायचं का होतं ? दर वेळीं कुणी यायचं असलं कीं तुम्ही मला गौरीसारखी सजून त्यांच्यापुढें यायला सांगतां. मला तें आवडत नाहीं. ”

" मी घरीं लोकांना बोलावतों त्यांत माझे कांहीं बेत असतात. ते बायकांना नाहीं कळायचे. हा मनुसखलाल कन्तानवाला म्हणजे सुरतेच्या जरी-कारखानदारांपैकीं मोठा असामी आहे. त्याला उगीच नाहीं बोलावलं मीं ! "

" तीं तुमचीं धोरणं तुम्ही सांभाळा ! आणि कुड्यांचं म्हणाल तर मला असला खोटेपणा करायला आवडत नाहीं नि कुणीं केलेला खपतही नाहीं. "

" ह्यांत खोटेपणाचा काय संबंध ? "

" खोटेपणा नाहीं तर काय ? खोटीं कुडीं घालून मी पाहुण्यांसमोर काय म्हणून बसूं ? "

कुड्यांच्या बाबतींत आपला डाव फसला हें त्याला कळून चुकलें ; पण तसें दाखवणें किंवा आपण फसवूं पाहात होतों हें कबूल करणें त्याच्या स्वभावांत नव्हतें. म्हणून आपली भूमिका कायम ठेवण्यासाठीं तो म्हणाला,

" कोण म्हणतं कुडीं खोटीं आहेत ? कुणाला दाखवायला गेली होतीस तूं ? "

" कुणी का म्हणेनात, खोटीं आहेत ना ? "

आतां त्याचा संयम थोडा सुटत चालला.

" दुसऱ्याकडून शहा–निशा करून घेण्याची तुला काय जरूर होती ? माझ्या शब्दावर तुझा विश्वास नव्हता ? "

" होता, पण तीं खोटीं ठरल्यावर ढासळला. तुम्ही इतरांना व्यापारधंद्यांत फसवीत असाल, तसं तुम्हांला करावंही लागत असेल, पण घरांत मलाही फसवाल असं नव्हतं वाटलं. "

" नॉन्सेन्स, कुणीतरी कांहींतरी सांगतं नि तूं त्याच्यावर विश्वास ठेवतेस ! आतां तुला इतकंच हें वाटत असेल तर आण तीं इकडे. मी तुला दुसरीं आणून देईन. झालं ? "

" पण हीं खरीं आहेत ना ? मग तसं कां नाहीं सांगत ? पण नाहींतच तर तुम्ही काय सांगणार ? जा तीं कुडीं घेऊन, पण मला आता दुसरीं कुडीं नकोत. तुम्हांला वाटलं असेल

मी कुड्यांसाठीं हें करतेंय्. मला कुडीं हवीं होतीं, पण मी कांहीं त्यांसाठीं हपापलें नव्हतें. तुम्हांला आतां सवड नव्हती, तर तुम्हीं आणखीं पांच काय दहा वर्षे नसतीं आणलींत तरी मला त्याचं कांहीं वाटलं नसतं. पण आणून खोटीं आणलींत आणि तेंही पुन्हा माझ्यापासून चोरून ठेवलंत. तुम्हांला वाटलं असेल, नगाला नग असला म्हणजे झालं. खोटं काय नि खरं काय ? इतर बायकांसारखीच दागिन्यांसाठीं आसुसलेली मी असेन अशी तुमची कल्पना. तुम्ही मला ओळखलंत नाहीं हेंच खरं. पण त्या कुड्यांमुळें तुमची मात्र मला पूर्ण परीक्षा झाली. आतां तुम्ही खरीं कुडीं आणलींत तरी तीं मी घालणार नाहीं."

असें म्हणून कपाटांतून कुड्यांची डबी काढून तिनें ती त्याच्यापुढें टेबलावर फेकली.

"असा त्रागा करण्यांत काय अर्थ आहे ? जगांत असं चालायचंच !"

"तें मला ठाऊक आहे आणि तुमची चाल जगासारखीच आहे तेही मला आतां कळलं. पण मी जाणून बुजून त्याला बळी पडणार नाहीं. आणि इतके दिवस गप्प बसून आज बोलतेंय् मी, जशी मी ह्यापुढे तुम्ही खरीं कुडीं आणलींत तरी तीं घालणार नाहीं, तशीच ह्यापुढें तुमच्या धंदेवाईक पाहुण्यांची मी घरीं बडदास्त ठेवणार नाहीं. तुम्हीं कुठें ताजमध्यें नाहींतर आणखी कुठें नेऊन त्यांना आपला बडेजाव दाखवा. तुमच्या धंद्यांतल्या लोकांची ओळख करून घ्यायलाही मी ह्यापुढे दुकानांतल्या बाहुलीसारखी सजून तुमच्याबरोबर येणार नाहीं."

"म्हणजे, विचार काय आहे तुझा ?"

"जो सांगितला तोच."

"त्याचे परिणाम कदाचित् तुला झेपणार नाहींत."

ती इतकें एकदम कधीं बोलली नव्हती. तिचे ओठ थरथरत होते. तिची नजर त्याच्यावर रोखलेली होती. तिच्या नजरेला नजर देण्याचें त्याला धैर्य होईना.

एवढ्याशा गोष्टीवरून लोक इतके कां हें करतात कोण जाणे, असा आशय दर्शवणारा हावभाव करून " ऑल राइट, मर्जी तुझी " असें म्हणून तो खोलींतून निघून गेला.

कुड्यांची डबी टेबलावरच पडली होती. तो बाहेर गेल्यावर तिला इतका वेळचा ताण सुटल्यासारखें झालें. खालीं खुर्चीवर बसून तिनें टेबलावर हात पसरले आणि त्यांमध्यें डोकें विसावून ती तशीच निश्चल राहिली. तिच्या डोळ्यांतून हळुहळू आसवें ठिबकूं लागलीं. तिच्या सुखाचें भांडें जें लवंडून थेंबाथेंबानें रिकामें होत चाललें होतें, तें त्या दिवशीं निःशेष रिकामें झालें.

# अ ड ग ळ

कांहीं वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. दिल्लींतल्या 'नॉव्हेल्टी' सिनेमांत महाराष्ट्र-समाजाच्या मदतीकरितां म्हणून 'ब्रह्मचारी' बोलपट लागला होता. अत्र्यांचा मराठी विनोदी बोलपट आणि तोही दिल्लीसारख्या ठिकाणीं. साहजिकच खूप गर्दी झाली होती.

महाराष्ट्रापासून लांब, दिल्लीसारख्या ठिकाणीं नोकरीच्या किंवा स्वतंत्र व्यवसायाच्या निमित्तानें जी महाराष्ट्रीय मंडळी गेलेली आहे, ती अशाच कांहीं ना कांहीं प्रसंगानें एकत्र येत असते. त्यांचा क्लब आहे, समाज आहे, खाजगी मित्रमंडळें आहेत, शिवाय सर्वांचे मिळून गणपतिउत्सव, दासनवमी, टिळकपुण्यतिथि, शिवजयंति असे प्रसंग साजरे केले जातातच. व्याख्यानें, प्रवचनें, कीर्तनें, नाटकें, वाद-विवाद, संमेलनें होत असतात. त्यामुळें सर्व महाराष्ट्रीय कुटुंबें एकत्र तर येतातच, शिवाय महाराष्ट्रीय संस्कृति नांवाची जी एक विशेष वस्तु आहे तिचेंही संरक्षण आणि संवर्धन केल्याचें त्यांना

समाधान लाभतें. कोणाचेंही कसेंही कमीअधिक उत्पन्न असलें तरी कोणालाही उपजीविकेची चिंता नसल्यामुळें त्यांच्या वृत्तींत एक प्रकारची सुस्थिरता आणि समाधानी वृत्ति आढळून येते. इतक्या लांबच्या ठिकाणीं, परप्रांतांत आपण मराठी बाणा टिकवून आहों ह्याचा त्यांना साहजिकच अभिमान वाटतो. आपली मराठी संस्कृति टिकवण्याचें एक साधन म्हणून जयंत्या–पुण्यतिथ्या–उत्सव ह्यांप्रमाणें त्यांनीं तिथें एक मराठी शाळाही चालविली आहे. ह्या शाळेच्या मदतीसाठीं किंवा एकंदरच समाजकार्याच्या मदतीसाठीं म्हणून, कधीं मराठी नाटकाचे प्रयोग केले जातात, तर कधीं मराठी बोलपट दाखवले जातात. अशा प्रसंगीं ज्यांना ज्यांना म्हणून येणें शक्य असतें, अशीं सगळीं मराठी माणसें – बायका, पुरुष आणि मुलें – येतात. कारण एक तर मराठी नाटक किंवा सिनेमा मुद्दाम योजना केल्याशिवाय दिल्लींत दिसायचीं नाहींत, तीं पाहाण्याची स्वाभाविक उत्सुकता असते; शिवाय त्या निमित्तानें आपण समाजकार्याला हातभार लावतों हें सत्कार्य केल्याचें समाधान मिळतें तें वेगळेंच. 'ब्रह्मचारी' बोलपटाचा प्रसंग हा त्यापैकींच होता.

खेळ संपून दारें उघडल्याबरोबर सगळीं माणसें, उपसून बाहेर फेकून दिल्यासारखीं, आंतल्या उबदार परंतु कोंदट वातावरणांतून निघून घाईघाईनें पोर्चमध्यें आणि फुटपाथवर आलीं. 'यमुनाजळिं खेळूं'चे लागट सूर अद्याप त्यांच्या कानांत खेळत होते आणि जलक्रीडेचे कुतूहल चाळवणारे देखावे डोळ्यांपुढें तरळत होते. दुपारची बारा साडेबारा वाजतांची वेळ होती, पण दिवस कडाक्याच्या थंडीचे असल्यामुळें सोन्याच्या पत्र्यासारखें चकाकणारें पिवळें चुरचुरीत ऊन हवेंहवेंसें वाटत होतें.

बाहेर आल्यावर कपड्यांतल्या कपड्यांत अंगाला थोडासा ताण देऊन, हिंवाळ्याबरोबर येणाऱ्या शरीरस्वास्थ्याची

सुखसंवेदना अनुभवीत मंडळी त्या उन्हाचा शेक घेत थोडीशी रेंगाळली. दिल्लीसारख्या ठिकाणीं हिंवाळ्यांत कपडे अंगावर चढवण्यांत आधींच एक प्रकारचा काव्यानंद असतो, त्यांत पुन्हा चार लोक जमतील तिथें जायचें म्हणजे कोणीही झालें तरी जरा नवे आणि ठाकठीक बेतलेले कपडे घालतोच. मऊ लोकरीचे आणि गुबगुबीत फर–कॉलरचे ओव्हरकोट किंवा आपल्या हातांनीं विणलेले तऱ्हेदार स्वेटरकोट दाखवायची बायकांना हीच संधि असते. त्यामुळें त्या वेळीं तिथें हेतुपूर्वक केलेल्या पोषाखांचा मेळाच भरल्यासारखा दिसत होता.

महाराष्ट्रीय स्त्रीपुरुषांची ती बहुरंगी वेषभूषा आणि त्यांची निरोगी अंगकान्ति निरखीत श्री. देखणेही कांहीं वेळ तिथेंच रेगाळले. ज्यांच्या अंगावर अद्याप मांस भरलें नाहीं अशा कोवळ्या मुली, ज्यांच्या अंगावर मांस मावेनासें झालें आहे अशा दडस प्रौढा आणि ज्यांच्या अंगावरचें मांस झडत चाललें आहे अशा जीर्ण वृद्धा, सर्व वयांच्या महाराष्ट्रीय स्त्रिया तिथें आलेल्या होत्या. त्यांतूनच एखादी रूपाढ्य आणि वेषाढ्य युवती अशा झोकांत स्वतःकडे आणि इतरांकडे पाही कीं जणूं 'कशी दिसतें आहें मी आज?' असें न विचारतांच विचारते आहेसें वाटे. तिच्याकडे श्री. देखण्यांचें लक्ष जाई.

श्री. देखण्यांचें लग्न झालेलें होतें. पण ते नुकतेच नव्या नोकरीवर दिल्लीला आले होते. त्यांची बिऱ्हाडाची व्यवस्था नीट लागली नव्हती, म्हणून ते तूर्त तिथें एकटेच होते आणि म्हणूनच त्यांना घरीं परतायची घाई नव्हती. त्यांची अजून कोणाशीं विशेष ओळखही झाली नव्हती. ते आणखीही कांहीं वेळ त्या पोषाखाच्या प्रदर्शनाकडे तसेच पाहात राहिले असते, पण हळुहळू लोक पांगूं लागले. 'साहेब' लोकांच्या मोटरी 'सर्रर्र–फट्–फट्' करीत नव्या दिल्लीच्या वाटेनें चालूं लागल्या. पीली कोठी (त्या वेळीं पीली कोठी अद्याप

उभी होती.) आणि लडलो कासलमध्यें काम करणारे कारकून लोक नया बाझार आणि नयी बस्तीमधल्या आपापल्या बिऱ्हाडांकडे निघाले आणि मग सुखावलेल्या मनानें आणि देहानें श्री. देखणेही आपल्या खोलीकडे जाण्यासाठीं म्हणून रस्ता ओलांडून समोरच्या फुटपाथकडे चालले. फुटपाथच्या मागच्या अंगाला रेल्वेच्या आवाराची पुरुषभर उंचीची भिंत आहे. तिच्या आधारानें तिथें नेहमीं भिकाऱ्यांचीं आणि भटक्यांचीं बिऱ्हाडें लागलेलीं असतात. श्री. देखणे रस्ता ओलांडून आले, तो समोरच कोणातरी मराठी मंडळीचाच तळ पडलेला त्यांना दिसला. एक तरुणशी बाई तीन दगडांच्या चुलीशीं बसून कांहीं तरी रांधीत होती. तिच्यापासून दोन हातांवर गोधडीच्या गुरफाट्यांत एक म्हातारी अंग गुरफटवून बसली होती. पलीकडे दोन मुलें एका कुत्र्याच्या पिलाशीं खेळत होतीं.

छानसा बोलपट पाहून नुकतीच आपापल्या घरांकडे परत चाललेली ती दिल्लीची स्थायिक सुखवस्तु मराठी मंडळी आणि पाठीवर बिऱ्हाड घेऊन भटकत हिंडणारी ही मराठी मंडळी; 'आज मी कशी दिसतें आहें?' असें न बोलतांच विचारणारी तऱ्हेदार पोशाख केलेली सिनेमाशोकीन रूपाढ्य मराठी युवती आणि सिनेमा थिएटराकडे पाठ फिरवून अपुऱ्या वस्त्रांनीं चावऱ्या थंडीशीं निष्फळ झगडा करीत चूल फुंकणारी ही मराठी युवती; ह्यांच्यांतला विरोध आणि उपरोध जाणवून श्री. देखण्यांच्या सुखावलेल्या, व्यवस्थित, पण न्यायान्यायाची जाणीव अगदींच न बुजलेल्या मनाला थोडासा धक्का बसला. आपण ह्या लोकांशीं थोडेंसें बोललों तर ह्या विरोधांतलें अंतर आणि अनिष्टता कांहीं तरी कमी होईल असें वाटून त्या बायकांना उद्देशून ते म्हणाले,

"कोण्या गांवच्या बाई तुम्ही?"

म्हातारीनें एक नापसंतीची नजर श्री. देखण्यांवर टाकली. तिला त्यांची ही चांभारचौकशी नको होती. पण त्या तरुण बाईनें उत्तर दिलें,

" नागपूरकलडे "

" खास नागपूरच्या काय ? "

" त्या तकलडे, अळजपुराकलडे ! "

" माणसं नाहींत काय संगती कुणी ? "

श्री. देखण्यांनीं अगदीं कर्तव्यबुद्धीनें चौकशी चालवली होती. पण तिकडे पूर्ण दुर्लक्ष करून " ए रांडे, कावून मारते व त्यायले ? " असें ती आपल्या मुलीला उद्देशून ओरडली आणि देखण्यांची दखल न घेतां पुन्हा चूल फुंकूं लागली.

सामाजिक आणि मानसिक समतानतेसाठीं सुखवस्तु मराठी मंडळीच्या वतीनें केलेल्या प्रयत्नांना त्या बेपर्वा बाईनें अपयश दिल्यामुळें त्यांना तिचा थोडासा राग आला आणि स्वतःचाही आला. पण लगेच तो अस्वस्थ विचार आणि तें वऱ्हाडी बिऱ्हाड मागें टाकून ते चालूं लागले. वाटेंत त्यांना बोरें विकायला बसलेलीं माणसें दिसलीं. जवळ जवळ लिंबाएवढीं मोठीं, गोल, टपोरीं, तांबूस, पिवळीं, रसरशीत बोरें होतीं. श्री. देखण्यांनीं पावशेर बोरें घेऊन ओव्हरकोटाच्या खिशांत घातलीं. दिल्लींतल्या ह्या बोरांसारखीं चवदार, रसाळ बोरें त्यांनीं पूर्वीं कधींही खाल्लीं नव्हतीं. खिशांतल्या खिशांत त्यांनीं एक हातांत घेतलें, त्याचें गरगरीत, तुळतुळीत स्पर्शसुख बोटांनीं अनुभवलें आणि मग तें बाहेर काढून हळूच तोंडांत घातलें. तर्जनी-अंगठ्याच्या चिमटींत पकडून, देठ तोडून फेकून दिलें आणि बोटांनीं अनुभवलेलें स्पर्शसुख जिभेला, तोंडाच्या आंतल्या भागाला अनभवूं दिलें. तें सुखोष्ण उन्ह, ते उबदार कपडे, सारें सारें सुखावह होतें. थोडीशी ऊब ओव्हरकोटाच्या कॉलरींतून बाहेर निसटत होती, ती पकडून ठेवण्यासाठीं त्यांनीं कॉलर उभी करून वर

ओढली आणि मग ते मोजल्याप्रमाणें पावलें टाकीत पुढें चालूं लागले.

रस्त्यावर बिऱ्हाड करून राहिलेलीं अळजपुराकडलीं बायकामुलें मागें पडलीं. 'यमुना जळीं' चे लागट सूर पुन्हा त्यांच्या कानांत घुमूं लागले आणि जलक्रीडेचे कुतूहल चाळवणारे देखावे पुन्हा मनापुढें तरळूं लागले. बोराची खरी चव त्याचा थोडासा चावा घेतल्याखेरीज कळत नाहीं, म्हणून त्यांनीं दांतांच्या सुळक्यांनीं तोंडांतल्या बोराचा थोडासा चावा घेतला. बोराची आंबटगोड चव चाखीत, त्यांत 'यमुनाजळीं' चे लागट सूर मिसळीत आणि त्याला जलक्रीडेच्या कुतूहल चाळवणाऱ्या देखाव्यांची साथ देत, धुंद लयींत, ते चालले होते.

मोरी दरवाजाकडे जाणाऱ्या पुलाच्या बाजूला ते वळणार, तोंच फुटपाथच्या मागल्या भिंतीकडे त्यांचें लक्ष गेलें. तेथून फाटक्या रजईच्या एका ढिगाऱ्यांतून दोन डोळे त्यांच्याकडे पाहात होते. बोंडल्यासारखे बटबटीत, कवडी-सारखे कोरडे, स्थिर, अनिमिष डोळे होते ते. त्यांना थोडीशी भीतिच वाटली त्या भकास, भेदक डोळ्यांची. झटकन् पुढें जावें असें त्यांना वाटलें, पण त्यांचे पाय पुढें पडायच्या ऐवजीं थबकल्यासारखे झाले. इतके निश्चल, भकास आणि भेदक डोळे त्यांनीं पूर्वी कधीं पाहिले नव्हते. त्या डोळ्यांचें काय करावें त्यांना कांहीं कळेना.

पण त्यांना कांहीं सुचण्यापूर्वींच तो माणूस उठून उभा राहिला आणि ते जागच्या जागीं खिळून जाऊन त्याच्याकडे पाहात राहिले. तो उभा राहिला, तशी त्याच्या खांद्यावरची फाटकी रजई गळून पडली. त्याचे डोक्याचे केस बोट बोट वाढलेले होते. तोंडावर दाढी मिशा माजल्या होत्या. चेहेरा भाजलेल्या पापडासारखा शुष्क होता. अंगावरचा शर्ट गळ्यापासून कमरेपर्यंत फाटला होता. पायजम्याच्या गुडघ्या-

खालीं झालरी झाल्या होत्या. तो उठून उभा राहिला आणि आपले वल्ह्यासारखे मोठे हात हलवीत एक एक पाऊल टाकीत क्षण दोन क्षणांत श्री. देखण्यांच्या पुढें येऊन ठाकला आणि " काय ? सिनेमा पाह्यला गेलां होतांत ? " असा त्यानें त्यांना शुद्ध मराठींत प्रश्न केला. तशा ठिकाणीं, तशा माणसाच्या तोंडून, तो शुद्ध मराठी प्रश्न ऐकून त्यांना धक्काच बसला.

तो जवळ येतांच श्री. देखणे दोन पावलें मागें सरले. कोणीही आपल्या अगदीं जवळ आलेलें त्यांना खपत नसे. त्यांतून त्या माणसाचें रूप आणि कपडे इतके किळसवाणे होते कीं तो त्यांच्याजवळ येण्यानें त्यांना अगदीं अस्वस्थ झालें. त्यांनीं निसटायचा प्रयत्न केला, पण ते जरा मागें सरताहेत, तों तो तितकाच पुढें झाला आणि त्यानें त्यांच्या ओव्हरकोटाचें बटन बोटांत धरलें आणि तो तें डावी–उजवीकडे फिरवूं लागला. त्यामुळें श्री. देखण्यांचा अगदीं नाइलाज झाला. त्या अनपेक्षित प्रसंगानें त्यांचें व्यवस्थित मन अगदीं गांगरून गेलें. त्यांच्या तोंडांतलें बोर त्यांना नकळत केव्हां तरी गपकन् घशाखालीं गेलें आणि त्यांना तोंड पोकळ वाटूं लागलें. श्री. देखण्यांनीं तो ओव्हरकोट दिल्लीला आल्यावर नवीनच्च करून घेतला होता. कपड्याची निवड आणि शिलाईचा सुबकपणा ह्यांबद्दल सर्वांनीं त्यांचें कौतुक केलें होतें, आणि त्या कोटाचें बटन तो इसम पीळ दिल्यासारखें डावी–उजवीकडे फिरवीत होता ! त्याबरोबर त्यांचें काळीज पिळवटत होतें. ' यमुना जळीं 'चे लागट सूर आणि जलक्रीडेचे कुतूहल चाळवणारे देखावे केव्हांच वाफेसारखे विरून गेले होते. पण ' काय सिनेमाला गेलां होतांत ? ' हा त्या भिकाऱ्याचा प्रश्न त्यांना सतावीत होता. जणूं आपण सिनेमाला गेलों हा कांहीं तरी मोठाच्च गुन्हा केला !

‘आज मी कशी दिसतें?’ असें न विचारतांच विचारणारी सिनेमाशोकीन, रूपाढ्य मराठी युवती आणि इतर वेषाढ्य मराठी स्त्रिया, त्यांच्याबरोबरचे, चिलगोजे आणि अक्रोड खाल्ल्यामुळें हिंवाळ्यांत ज्यांच्या गालांना थोडीशी गुबगुबीत गुलाबी छटा आली आहे असे, मराठी पुरुष, त्यांच्यापासून पंचवीस पावलांवर, केवळ रस्त्याच्या रुंदी-इतक्या अंतरावर, बिऱ्हाड मांडून अपुऱ्या वस्त्रांनीं चावऱ्या थंडीशीं झगडत चूल फुंकीत बसलेली मराठी स्त्री आणि आतां हा भाजल्या पापडासारख्या शुष्क चेहेऱ्याचा, कवड्यांसारख्या कोरड्या डोळ्यांचा मराठीच पुरुष ह्यांनीं श्री. देखण्यांचें व्यवस्थित मन असें कांहीं गोंधळून गेले कीं ते मनाशींच म्हणाले, ‘ह्यः! जग तरी एखाद्या अडगळीच्या खोलीसारखंच आहे. नकोत त्या वस्तु पायांत अडमडतात आणि अकल्पितपणें माणसाला तोंडघशीं पाडतात.’

‘तुम्ही सिनेमाला गेलां होतांत ना?’ ह्या त्याच्या प्रश्नानें श्री. देखणे कोलमडले होते. त्यांतून सावरायला त्यांना थोडासा वेळ लागला. मनांतल्या मनांत थोडेसें स्थिरावल्यावर त्यांनीं त्याला विचारलें,

“काय पाहिजे तुला?”

“मला? मला कांहीं नको. तुम्ही मजेंत आहांत ना?”

आतां ह्या प्रश्नाला उत्तर काय द्यायचें? ‘मी मजेंत असलों तर ह्याचं काय बिघडतं?’ पण कसें तरी करून तिथून सहीसलामत निसटायचें एवढीच त्यांची इच्छा होती. म्हणून त्यांनीं चटकन् सांगितलें,

“हो. मजेंत आहें.”

“तें तुमच्या कपड्यांवरून दिसतंच आहे. तुम्ही टीचर असतांना कांहीं असे कपडे नव्हते तुमचे. इथें कुठें मोठ्या नोकरीवर आहांत काय?”

...१४५

ह्या त्याच्या बोलण्यानें तर श्री. देखणे स्तंभितच झाले. आपण शिक्षक होतों हें ह्याला कसें कळलें ? का हा आपल्याला ओळखतो ? ते त्याच्याकडे निरखून पाहूं लागले. पण त्याच्या भकास चेहेऱ्यावरून आणि शुष्क डोळ्यांवरून त्यांना कांहींच बोध होईना. त्यामुळें त्यांच्या व्यवस्थित मनाचा अधिकाधिक गोंधळ होत चालला. त्यांना तिथून जायचें सुचेना आणि राहावेंसेंही वाटेना. अखेर कांहीं तरी बोलायचें म्हणून ते म्हणाले,

" इथें कसा आलास तूं ? "

" इंग्रजी तिसरींत तीनदा नापास झालों. आम्ही 'ढ' ना ? तेव्हां वडलांनीं घराबाहेर हाकलून दिलं. म्हणाले, 'तुझं पोट तूं भर. पुन्हा ह्या घराची पायरी चढूं नको.' मीं एका दुकानांत नोकरी धरली. तिथें येऊन त्यांनीं मालकाला सांगितलं, 'गाढव आहे माझा मुलगा. त्याला कांहीं अक्कल नाहीं. तो तुमच्या कामांत गोंधळ करून ठेवील. काढून टाका त्याला.' मग मी हमाली करूं लागलों. पण मोठीं ओझीं उचलत ना आणि कमाईंत पोट भरेना. दुसरं, खरं सांगूं ? मी कुणाचं तरी ओझं घेऊन चाललों म्हणजे एखादे वेळी कुठे तरी आई दिसायची नि मला पाहून तिच्या डोळ्यांना पाणी यायचं, तें मला सहन होईना. . ."

हें सांगतांना त्याच्या कवड्यांसारख्या कोरड्या डोळ्यांनाही ओलावा आला. तो पुढें बोलूं लागला,

" मग मीं जी मुंबई सोडली, तो देशभर भटकत राहिलों. अहो, हमालीपेक्षां भिक्षेंत कमाई जास्त होते. मग मीं तोच धंदा पत्करला. कागद आहे का एक ? "

श्री. देखण्यांनीं त्याला आंतल्या कोटाच्या खिशांतून एक कागदाचा तुकडा काढून दिला.

" पेन्सिल द्या. "

त्यांनीं पेन्सिल दिली. त्यांची यंत्रासारखी हालचाल चालली होती. ते त्याच्याकडे अधून मधून पाहात, पण अजूनही त्यांना

त्याची ओळख पटेना. एकीकडे कागदावर लिहीत तो बोलत होता,

" आमच्या वडलांचा पत्ता लिहितोंय्. कधीं मुंबईला गेलांत, तर जा त्यांच्याकडे आणि विचारा त्यांना ' तुमचा मोठा मुलगा कुठें आहे ? ' जरा मजा येईल. अहो, आमच्या घरीं मोटर होती. आतांही असेलच. मी मोटर चालवायला शिकत होतों. पण तीसुद्धा आमच्या वडलांनीं धड शिकूं दिली नाहीं. म्हणाले, ' तूं स्वतः मरशील आणि दुसऱ्यांचा जीव घेशील. ' आहेत कीं नाहीं वडील ? अं ? "

असें म्हणून त्यानें श्री. देखण्यांच्या ओव्हरकोटाचें बटण पुन्हा बोटांत धरलें, मोटरच्या स्टिअरिंग व्हीलसारखें खूप जोरांत डावी उजवीकडे फिरवलें आणि ' जाव साले ' म्हणून सोडून दिलें.

" आईला मात्र सांगा हं, मी खुशाल आहें. हं. हा आमचा पत्ता. "

श्री. देखण्यांच्या हातांत कागदाचा कपटा देऊन तो झटकन् आपल्या जागेकडे निघाला.

श्री. देखण्यांनीं सुटकेचा निश्वास टाकला. त्यांचे हात नकळत ओव्हरकोटाच्या खिशांत गेले. उजव्या खिशांत त्यांना बोरें लागलीं. तीं खाण्याची त्यांना लवमात्रही इच्छा उरली नव्हती. त्यांनीं तीं सगळीं बाहेर काढलीं आणि त्याला हाक मारून म्हटलें,

" घे, हीं बोरं घे. "

तो मागें वळला, क्षणभर थबकला आणि म्हणाला,

" नको. माझ्या हातांत हीं बोरं पाहिलीं कुणीं तर तो म्हणेल, ' तूं चोरलींस हीं. ' "

तो क्षणभर तसाच उभा राहिला. मग म्हणाला,

" बरं द्या. मीं कष्ट केले, भीक मागितली, पण चोरी केली नाहीं हं कधीं. त्यापेक्षां उपाशी राहीन. इथें दिल्लींत फार

चांगलं आहे. अहो इथले शेठ-सावकार गायी–गुरांसाठीं मिठाचे खडक रस्त्यावर ठेवतात, तर इथें माणसं उपाशी मरणार आहेत ? तुम्ही कधीं यमुनेवर गेलां आहांत पहांटे ? कुदसिया बागेच्या, नाहीं तर निगमबोध घाटाच्या बाजूला, यमुनेकडे जाणाऱ्या रस्त्यावर पहांटे चणेवाल्यांचीं दुकानं बसलेलीं असतात. त्यांच्या शेजारींच आम्ही असतों. लालाजी-लालायिनी स्नान करून परत जातांना पैशा-दोन पैशांचे चणे घेतात आणि भिकाऱ्यांना वांटतात. कधीं कधीं माझ्याजवळ इतके चणे जमतात कीं तीन दिवस पुन्हा जावं लागत नाहीं. आतां मी इथून हरद्वारला जाणार आहें. बरंय्, मुंबईला आमच्या घरीं जा वेळ झाला तर आणि आईला सांगा हं, कीं मीं चोरी कधीं केली नाहीं."

एवढें बोलून तो आपल्या जागेवर जाऊन बसला आणि गोधडी अंगाभोवतीं गुंडाळून घेऊन श्री. देखण्यांनीं दिलेलीं बोरें खाऊं लागला.

श्री. देखणेही घराच्या वाटेनें जाऊं लागले. त्यांच्या मनाची व्यवस्थित बैठक पार उधळून गेली होती. 'हा इसम कोण ? हा आपल्याला ओळखतो, पण आपल्याला त्याची ओळख पटत नाहीं. असं कां ? घरचा चांगला श्रीमंत दिसतो, मग असा भीक कां मागतो ? त्याला शहाणा म्हणावं, का वेडा...' त्यांचा अगदीं गोंधळ उडाला. अधिक पगाराच्या नोकरीसाठीं दिल्लीला आलेले ते प्रतिष्ठित, दिल्लींतले ते नोकरीवाले प्रतिष्ठित आणि तो प्रतिष्ठित गृहस्थाचा अप्रतिष्ठित मुलगा, हीं इतक्या अल्प अवधींत अकल्पितपणें एकमेकांत गुंतून गेलेलीं पाहून त्यांना हें समजेना कीं अडगळीचें सामान दिवाणखान्यांत येऊन पडलें कीं दिवाणखान्याचीच अडगळीची खोली झाली ? निर्जीवपणानें जड पावलें टाकीत चालले होते ते. त्यांचे हात पुन्हा ओव्हरकोटाच्या खिशांत गेले. त्यांच्या हाताला तो कागदाचा कपटा लागला. त्यांनीं

तो बाहेर काढला. पुन्हा पुन्हा वाचून पाहिल्यावर अंधारांत एकदम चक्क प्रकाश पडावा तसें त्यांना झालें. मुंबईतल्या एका सुप्रसिद्ध, प्रतिष्ठित, स्वयंसिद्ध गृहस्थाचें नांव आणि पत्ता त्यावर होता. मग त्यांना आठवलें, त्या गृहस्थाचा एक मुलगा आपल्या शाळेंत होता. आणि केवळ तो मंद म्हणून बापानें त्याचा छळ करून त्याला वेडा ठरवून घराबाहेर काढलें होतें. सगळयांनीं 'वेडा-वेडा' म्हणून हिणवून धुतकारल्यामुळें तो खरोखरच वेड्यासारखा दिसूं, वागूं लागला होता. हमाली करतांनाही त्यांनीं त्याला कधीं कधीं पाहिलें होते आणि मग तो एकदम दिसेनासा झाला होता.

पण ह्या सगळ्या गोष्टी आठवल्यानें समाधान वाटण्या-ऐवजीं त्यांना उलट अधिकच असह्य वाटलें आणि ते तशाच स्थितींत घरीं पोचले.

त्या प्रसंगाचा त्यांच्या मनावर जबरदस्त घाव बसल्या-सारखें झालें. त्या माणसाच्या त्या अवस्थेबद्दल त्याचा बापच नव्हे, तर आपण, आपला सगळा समाज, जबाबदार आहे असें त्यांना वाटूं लागलें आणि एखाद्या अपराध्यासारखी त्यांच्या मनाची स्थिति झाली.

त्यामुळें त्यानंतर पुन्हा जेव्हां जेव्हां त्यांना फत्तेपुरीला जाण्याचा प्रसंग येई, तेव्हां तेव्हां ते पुलावरून डावीकडे न वळतां उजवीकडे वळून नव्या बाजारांतून जात किंवा सरळ समोर रंगमहलमध्यें शिरून खारी बावलीवर बाहेर पडत. पण तो माणूस भेटलेला कोपरा ते टाळीत. आपल्याजवळ बोलल्याप्रमाणें तो हरद्वारला गेला असेल, तिथें तो आतां नसेल, असें ते आपल्या मनाला सांगत आणि तरी त्यांना त्या वाटेनें जायचा धीर होत नसे.

# आ ठ व ण

आतां मी जी गोष्ट सांगणार आहें, ती माधव नांवाच्या एका मुलाची आहे. पण तिला गोष्ट म्हणण्यापेक्षां आठवण म्हणणेंच अधिक योग्य होईल. ज्या वेळची ही हकीकत आहे, त्या वेळीं माधवचें वय अकरा-बारा वर्षांचें असेल. तो नुकताच इंग्रजी चौथींत गेला होता. चौथीचा वर्ग म्हणजे विद्यार्थ्यांना किती महत्त्वाचा वाटतो! त्या वर्गात गेल्यावर संस्कृतला सुरुवात होते. अंकगणिताबरोबर आल्जिब्रा—जॉमेट्रीचा अभ्यास करावा लागतो. सायन्सचे विषयही पूर्वीपेक्षां अधिक कठीण होतात आणि त्या वर्गांत गेलें म्हणजे आपण आतां पूर्वीपेक्षां थोडे वेगळे आणि थोडे मोठे झालों असें मुलांना वाटूं लागतें.

तसेंच साहजिकच माधवलाही वाटूं लागलें. त्यांतून त्याला विशेष वाटलें तें ह्याचें कीं आपण आतां मोने मास्तरांच्या वर्गांत जाणार. मोने मास्तर चौथीचे वर्गशिक्षक असत

---

ही गोष्ट रेडिओवरून सांगण्यांत आली आहे. त्यामुळें तिची निवेदन-पद्धति केली असल्याचें दिसून येईल.

आणि चौथीपासून सातवीपर्यंत इंग्रजी शिकवीत. मुलांना आपल्या विषयाबद्दल गोडी वाटायला लावणारे शिक्षक, शिस्तीचे भोक्ते, पण विद्यार्थ्यांना अभ्यासांत मदत करायला हसतमुखानें तयार, असा मोने मास्तरांचा लौकिक होता. त्यांच्या हाताखालून गेलेल्या प्रत्येक विद्यार्थ्याला त्यांच्याबद्दल अतिशय कौतुक आणि अभिमान वाटे आणि त्यांतच सूक्ष्म अशी भीतीचीही छटा मिसळलेली असे.

माधवचे तसे सगळेच विषय चांगले होते. पण भाषा-विषय त्याला विशेष आवडे. आणि आपण इंग्रजी उत्तम करावें असें त्याला नेहमीं वाटे. म्हणूनच आपण आतां मोने मास्तरांच्या वर्गांत जाणार, ह्यापुढें आपल्याला त्यांच्या हाताखालीं इंग्रजी शिकायला मिळणार ह्याचें त्याला विशेष महत्त्व वाटत होतें.

* * *

वर्ग बदलल्यानंतरचा पहिला दिवस होता. सगळीं मुलें मोने मास्तरांची उत्कंठेने वाट पाहात होतीं. त्यांची ती डोळ्यांना सोनेरी चौकटीचा चष्मा लावलेली, आटोपसर, तरतरीत मूर्ति वर्गांत आल्याबरोबर मुलांमध्यें एक क्षणभर चुळबूळ झाली आणि नंतर तीं चित्रांसारखीं स्तब्ध बसलीं.

वर्गांत आल्याबरोबर आधीं खुर्चीपाशीं जायचें आणि मग टेबलाच्या पुढें येऊन उभें राहायचें, अशी मोने मास्तरांची पद्धत असे. त्याप्रमाणें ते टेबलापुढें येऊन उभे राहिले आणि एकवार सगळ्या वर्गावरून नजर फिरवून म्हणाले,

"मुलांनो, आतां तुम्ही इंग्रजी चौथींत आलां आहां. इथून तुमच्या हायस्कूलच्या शिक्षणाला प्रारंभ होणार. आतां तुमच्या अभ्यासाच्या विषयांत भर पडेल, तसा तुमच्या अभ्यासाच्या पद्धतींतही फरक पडला पाहिजे. आतांपर्यंत इंग्रजीच्या अभ्यासांत व्याकरण-भाषांतरावर, पाठ करण्यावर भर होता. तुम्ही आपल्या शिक्षकांवर जवळजवळ सर्वस्वीं

अवलंबून होतां. आतां तुम्हीं चांगलं इंग्रजी बोलायला-लिहायला शिकलं पाहिजे. चांगलं इंग्रजी वाचायची सवय केली पाहिजे. स्वतःच्या प्रयत्नावर अधिकाधिक अवलंबून राहिल पाहिजे. त्यासाठीं ह्यापुढें प्रत्येकानें आपल्याजवळ एक डिक्शनरी ठेवायला हवी. शब्द अडला कीं डिक्शनरींत पाहायचा, अशी सवय लावून घ्या. हळुहळू तुमचा शब्दसंग्रह वाढत जाईल..."

मास्तरांचें भाषण चाललें होतें. मुलें तें अगदीं लक्षपूर्वक ऐकत होतीं. माधवनें आपल्या मनाशीं निश्चय केला कीं आपणही डिक्शनरी आणायचीच. इंग्रजीचं वाचन वाढवायचं, इंग्रजी चांगलं करायचं, आणि मोने मास्तरांकडून वाहवा घ्यायची...

डिक्शनरी आणायची असें माधवनें मनाशीं ठरवलें खरे, पण आणायची कशी? वीस पंचवीस वर्षांपूर्वीं झालें, तरी चांगल्या डिक्शनरीला निदान तीन चार रुपये पडत आणि त्याच्याजवळ तर तीन चार आणेही नव्हते.

माधवचे वडील त्याच्या लहानपणींच वारले होते. त्याची आई होती ती आपल्या गांवीं राहून कांहीं तरी मोलाचीं कामे करी. त्यांत तिचें स्वतःचें जेमतेम भागे. पण तिला आपल्या मुलाला कांहीं मदत करतां येत नसे. म्हणून तो येथें शहरांत एका लांबच्या काकांकडे शिकायला राहिला होता. त्यांनीं केवळ त्याची राहायची सोय केली होती आणि त्याचा आठवड्यांतला एक जेवणाचा वार आपल्याकडे ठेवला होता. पण त्यासाठीं त्याला काकांच्या मुलांना सांभाळावें लागे. कपडे धुवावे लागत. त्यांना फिरायला न्यावें लागे. घराचा केर काढावा लागे, दिवे पुसणें वगैरे कामें करावीं लागत. सकाळची पूजा आणि संध्याकाळची आरतीही त्याच्याकडेच असे.

इतक्यांतून वेळ काढून अभ्यास करून त्यानें आपला नंबर पांचाच्या आंत ठेवला होता.

ठेवायला हवाच होता, नाहींतर त्याची नादारी गेली असती आणि शिक्षण थांबलें असतें. कोणाच्या पुस्तकाला कव्हर घालून दे, कुणाच्या वह्या शिवून दे, कोणाला अभ्यासांत मदत कर, असें करून तो इतरांकडून अभ्यासाचीं पुस्तकें मिळवी, आणि आपली गरज भागवी. कोठे ब्राह्मण म्हणून कधींकाळीं पैसा दोन पैसे दक्षिणा मिळाली तरच काय ते त्याला पैसे दिसत. अशा स्थितींत तो डिक्शनरी घेणार कशी ?

डिक्शनरी घ्यायला तर हवी, पण ती घ्यायची कशी तें कळत नाहीं, अशा विवंचनेंत असतांनाच एकदा तो सहज त्यांच्या शेजारींच गोविंदराव नांवाचे एक गृहस्थ राहात असत, त्यांच्याजवळ त्यासंबंधीं बोलला. तेव्हां ते म्हणाले,

"डिक्शनरी मिळण्यासारखी आहे. पण ती तुला जाऊन आणावी लागेल."

"आणीन मी. कुठें आहे सांगा." माधव उत्कंठेने म्हणाला.

"डिक्शनरी माझीच आहे. पण ती इथें नाहीं. आमच्या गांवीं आहे. तूं जाऊन आणीत असलास तर बघ. मी तुला चिठ्ठी देतों. तूं जाऊन डिक्शनरी घेऊन ये आणि वापर."

माधव गप्प बसला होता. गोविंदरावांना वाटलें, आपल्याला डिक्शनरीचे पैसे द्यावे लागतील कीं काय ह्याचा माधव विचार करीत असावा. म्हणून मग तेच पुन्हा म्हणाले,

"मला पैसे नको आहेत तिचे. तशीच वापरायला घे आणि लागेल तितके दिवस वापर."

कांहीं पैसे द्यावे न लागतां डिक्शनरी मिळते आहे ह्याचाच माधवला इतका आनंद झाला कीं गोविंदरावांचें गांव कुठें आहे, किती लांब आहे, तेथें कसें जायचें, हे प्रश्न विचारायचें त्याला भानच राहिलें नाहीं.

मग पुन्हा तेच म्हणाले,

"इथून आठ-दहा मैल तरी आहे गांव. जाशील तूं ? पायीं जावं लागेल."

गांव आठ-दहा मैल लांब आहे हें ऐकल्यावर माधवचा धीरच खचला. तरी पण हिय्या करून तो म्हणाला,

"जाईन मी. येत्या रविवारीं जाईन. द्या तुम्ही चिठ्ठी."

★ ★ ★

ठरल्याप्रमाणे रविवारीं सकाळीं माधव गोविंदरावांच्या गांवाकडे जायला निघाला. एका डिक्शनरीसाठीं जातां-येतां वीस-बावीस मैलांची पायपीट करायची. इतकें चालायचें म्हणजे किती ह्याची त्याला कल्पनाही नव्हती. पण त्याला डिक्शनरी हवी होती. पैसे खर्च करावे न लागतां हवी होती. त्यासाठीं त्याला पडतील ते कष्ट करणे भाग होतें. ते तो करीत होता.

शहरापासून तीन-चार मैल गेल्यावर मुख्य सडक सोडून कच्च्या वाटेनें रस्ता जात होता. त्या रस्त्यानें तो चालला. सकाळच्या वेळीं पक्क्या सडकेची चाल होती. रस्त्यानें दुतर्फा झाडें होतीं, तोंपर्यंत त्याला त्याचें कांहीं वाटलें नाहीं. पण आतां ऊन चढत चाललें होतें. देशावरचा उन्हाळा, मातीचा फुपाटा, पायांत जोडा नाहीं, डोक्यावर छत्री नाहीं, पोटांत अन्न नाहीं, त्यामुळें त्याला चाल जड जाऊं लागली. मध्येंच कुठेंतरी बसावेंसें वाटे, पण दगड तापत चालले होते. सावलीला झाड नव्हतें. रस्त्याच्या बाजूबाजूला झाडें दिसत होतीं, तीं सारीं बाभळीचीं नाहींतर हिवराचीं. तीं सावली कसली देणार ! उलट त्यांचे ते तिखट कांटे चावायला सरसावल्या-सारखे वाटत. लांब कुठें तरी एखादी आंबराई दिसली तरी वाट सोडून सावलीसाठीं तिथपर्यंत जायचें, म्हणजे चाल वाढायची आणि पुन्हा तिथून परतल्यावर ऊन लागायचें तें लागायचेंच.

तो तसाच चालत राहिला. आणखी तास-दोन तास चालला. पाय जड होऊं लागले. त्यांना धोंडे बांधल्यासारखें वाटूं लागलें. त्यांची आग होऊं लागली. गोविंदरावांचें गांव कधीं येणारच नाहीं असें माधवला वाटूं लागलें. आपण वाट तर चुकलों नसूं ना, अशी मध्येंच त्याला शंका येऊं लागली. आणि शंका आली कीं त्याच्या काळजांत धप्प होई.

मध्येंच कुणी भेटलें म्हणजे तो विचारी,

" काहो भाऊ, सोनगांवची वाट हीच काय ? "

ते म्हणत, " हीच. "

" किती लांब आहे इथून ? "

" हें इथेंच तर आहे. असाच जा नीट. "

पण त्यांनीं " हें इथेंच " सांगितलें, तरी गांव लांब लांबच चालल्यासारखें त्याला वाटूं लागलें.

आतां अगदीं पाय तुटतात अशी त्याची स्थिति झाली. तोंच रस्त्यापासून लांब एका अंगाला आंब्या-लिंबाचीं झाडें दिसूं लागलीं. गोविंदरावांनीं सांगितल्याप्रमाणें बाहेरच्या बाजूच्या देऊळ आणि इतर खुणाही दिसूं लागल्या. त्याला धीर आला. ज्यासाठीं त्यानें ही अवघड तपश्चर्या आरंभली होती, तिचें फळ हाताशीं येत चाललें होतें. त्यानेंच त्याचा अर्धामुर्धा शीण गेल्यासारखा झाला.

तो गांवांत शिरला आणि एकदोघांना विचारून देशमूख मास्तरांच्या घरीं जाऊन पोचला. समोरच ओटीवर एक गृहस्थ, तार, हातोडी, पकड, अशीं अवजारें घेऊन कांहींतरी करीत बसले होते. त्यांच्या झुपकेदार मिशा आणि करडी मुद्रा पाहून माधवला त्यांची थोडीशी भीतिच वाटली. आणि आपल्या मनाशींच 'हेच तर देशमूख मास्तर नसतील ? आणि हेच असले तर ?' असें म्हणत तो हळुहळू पुढें झाला आणि म्हणाला,

" मला देशमूख मास्तरांना भेटायचंय्. "

" मीच तो. काय काम आहे ? "

त्यांची मुद्रा जशी करडी, तसा आवाजही कठोर होता. माधवला वाटलें, आपण ज्यासाठीं इतके लांब आलों तें आपलें काम होणार कीं नाहीं कुणाला ठाऊक ? समजा, ते डिक्शनरी देत नाहीं म्हणाले तर ? अशा शंकाकुशंकांत मन बुचकळ्या खात असतांनाच त्यानें गोविंदरावांची चिठ्ठी त्यांच्या हातांत दिली.

देशमूख मास्तरांनीं ती चिठ्ठी वाचली आणि त्यांच्या कपाळाला एक बारीकशी आठी पडली. देशमूख मास्तर मराठी शाळेंत मास्तर होते, पण त्यांच्या इंग्रजीच्या एक दोन यत्ता झाल्या होत्या आणि आपण आपलें इंग्रजी वाढवायचें अशी त्यांची बऱ्याच वर्षांपासून इच्छा होती. त्यासाठीं त्यांनीं गोविंदरावांची डिक्शनरी आपल्याजवळ ठेवून घेतली होती. आपलें इंग्रजीचें ज्ञान त्यांनीं वाढवलें नव्हतें आणि ती इच्छाही वर्षें जाऊं लागलीं तशी क्षीण होत चालली होती, पण अजिबात नाहींशी झाली नव्हती. आतां त्यांना तिची कळ उठल्याप्रमाणें आठवण झाली. चिठ्ठी वाचून थोडा वेळ ते स्तब्ध राहिले. नंतर थोडेसे रुष्ट झाल्यासारखे दिसले. मग सावकाश उठून वरच्या कोनाड्यांतून त्यांनीं एक लठ्ठ पुस्तक काढलें, त्यावर बरीचशी धूळ सांचली होती ती फुंकरी मारून आणि हातानीं झटकून काढून टाकली आणि माधवपुढें तें पुस्तक ठेवीत ते म्हणाले,

" हं, ही डिक्शनरी. मला हवी होती ती इथें, पण ती गोविंदरावांचीच आहे, आणि त्यांनीं ती तुझ्याजवळ द्यायला सांगितली आहे, घेऊन जा. ज्याची वस्तु त्याला दिलीच पाहिजे. आतांच त्यांचं डिक्शनरीवांचून काय अडलं आहे कुणाला ठाऊक. पण जा घेऊन ती तूं. "

एवढें बोलून ते पुन्हा पकडीनें तार वाकवूं लागले.

" डिक्शनरी मला हवी आहे, गोविंदरावांना नाहीं. "

माधव बोलून गेला.

“ तुला हवी आहे ? गोविंदरावांना नाहीं ? मग. . .म. . .पण मग त्यांनीं काय लिहिलंय चिठ्ठींत कीं ‘ मला डिक्शनरीची फार जरूर आहे. ताबडतोब पाठवून द्या.’ ”

माधवला वाटलें, गोविंदरावांनीं तसे मुद्दाम लिहिलें असलें पाहिजे. तसें लिहिले नसतें तर देशमूख मास्तरांनीं कदाचित् डिक्शनरी दिली नसती आणि आतां आपण त्यांना खरें सांगून टाकले आहे. ते पुन्हा आपल्याकडून ती परत तर घेणार नाहींत ! ही शंका मनांत येतांच त्याच्या हाताचीं बोटें नकळत डिक्शनरीवर आंवळलीं गेलीं.

देशमूख मास्तरांच्या ओठांची कांहींतरी पुटपुट चालली होती. ते मग मोठ्यानें म्हणाले,

“ जा, जा घेऊन ती. ”

माधवचें मन किंचित् गोंधळल्यासारखें झालें. काय बोलावें तें त्याला कळेना. मिनिट अर्ध मिनिट तो तसाच राहिला. आणि मग ‘ बरं येतों. ’ असें म्हणून डिक्शनरी उचलून घेऊन बाहेर पडला.

एव्हांना ऐन दुपारची वेळ झाली होती. चालण्यानें तो आधींच दमून गेला होता. त्यांत आतां भुकेनें त्याला पोटांत ओढल्यासारखें होऊं लागलें. सकाळीं तो घरून निघाला तेव्हां त्याच्या काकांनीं किंवा काकूंनीं ‘ तूं जातोहस तें गांव किती लांब आहे ? तूं कसा जाणार आहेस ? तूं परत केव्हां येणार ? वाटेनें खायचं काय करणार ? ’ कांहींदेखील विचारलें नव्हतें.

आपण ज्यांच्याकडे डिक्शनरीसाठीं आलों होतों, ते आपली कांहीं तरी चौकशी करतील, कांहीं थोडें तरी खायला देतील, अशी त्याला अंधुक आशा वाटत होती. पण त्यांनीं त्याची एका शब्दानेंही विचारपूस केली नाहीं. त्यामुळें त्याला अधिकच दुःख झालें आणि तो अगदीं रडकुंडीला आला. जगांत आपलें कोणीच नाहीं, आपल्याला कोणी त्राता नाहीं

आणि आपल्याला सारा जन्म असाच हालांत आणि एकस्थानें काढावा लागणार असें त्याला वाटूं लागलें.

जड पावलांनीं आणि त्याहून जड अंतःकरणानें तो शहराकडे परत निघाला. परत जातांना त्याला रस्ता हलका वाटावा, पण उलट तो भारी वाटत होता. गांव संपत आलें तशी एका घराच्या दारांतून त्याला अंगणांतली विहीर दिसली. विहिरीपुढला ओलावा पाहूनच त्याला जरासें गार आणि शांत वाटलें. आंत जाऊन निदान पाणी तरी मिळालें तर प्यावें असा विचार करून तो दारांतून आंत शिरला. समोरच पडवींत एक पोक्तशी मराठमोळा बाई धान्य निवडीत बसली होती. तिला तो म्हणाला,

"बाई, पाणी घेऊं का विहिरीचं? तहान लागली आहे भारी."

त्याचीं धुळीनें माखलेलीं पावलें, मळलेलें धोतर, मलूल चेहेरा हीं पाहूनच बाईनें ओळखलें कीं मुलगा लांबून आला असावा. ती म्हणाली.

'ये. आधीं बैस जरा इथें नि विसांवा घे. मग पाणी पी. उन्हांतून आलेला दिसतोस. तसं एकदम पाणी पिऊं नये. कुठून आलास?"

"शहरांतून" त्यानें उत्तर दिलें. आणि मग आपण कुणाकडे, कशासाठीं आलों होतों, आपले घरीं कोणकोण आहे, आपण कुठें कसें शिकतो, तें सगळें त्यानें भडाभडा तिला सांगितलें. त्याचें बोलणें ऐकून घेऊन ती म्हणाली,

"विहिरीच्या थंड पाण्यानें हातपाय तोंड धू स्वच्छ. ब्राह्मणाचा आहेस तूं. आमच्या घरचं रांधलेलं चालायचं नाहीं तुला. पण तसा उपाशीं जाऊं नको."

विहिरीवरून हातपाय धुऊन माधव पुन्हा पडवींत येऊन बसला. बाईनें एक मोठें फुलपात्र भरून दूध आणून

त्याच्यापुढें ठेवलें आणि त्यांत एक गुळाचा खडा टाकीत ती म्हणाली,

" घे. सावकाश पी. घाई नको करूं. "

बाईच्या प्रेमळ वागणुकीनें माधवला अगदीं गहिंवरून आलें आणि उचललेलें फुलपात्र त्यानें पुन्हा खालीं ठेवलें.

" कांहीं वाटूं देऊं नको बाळ, मनाला. माझ्या मुलासारखा आहेस तूं. " असें म्हणून ती त्याच्या जवळ येऊन बसली आणि तिनें भांडें उचलून त्याच्या हातांत दिलें.

उपाशी पोटांत दूध गेल्यावर त्याला थोडीशी सुस्ती आली. पाठीमागच्या खांबावर त्याचें डोकें टेकलें आणि त्याला डुलकी लागली. त्याबरोबर शेजारींच एक जाडसा सुताडा आंथरून त्यावर बाईनें त्याला निजवलें.

तो जागा झाला तेव्हां अंगाखालीं जाड मऊ सुताडा पाहून त्याला फार नवल वाटलें. आपल्या काकांच्या घरीं त्याला फाटक्या पोत्यावर, जागा मिळेल तिथें निजावें लागत असे. त्याला ओशाळल्यासारखें झालें. तो लगबगीनें उठून उभा राहिला. ऊनही कललें होतें. त्याला पहिल्याइतकेंच अंतर तुडवीत परत शहरांत जायचें होतें. कपडे नीट करून डिक्शनरी उचलून तो जायला निघाला. तेव्हां नको नको म्हणत असतांना बाईनें त्याच्या खिशांत मूठमूठ डाळें आणि चुरमुरे भरलेच आणि त्याला जवळ घेऊन त्याच्या पाठीवरून हात फिरवीत ती म्हणाली,

" शिकून शहाणा हो बाळ आणि चांगली मोठी नोकरी मिळव. "

" बरंय्, येतों आई. खरंच तुम्ही माझ्या आईसारख्या आहां. " असें म्हणून तिच्या पायांवर डोकें ठेवून तो बाहेर पडला.

*       *       *

शहरांत पोचून घरीं येईतों दिवे लागायला झाले होते. खरें म्हणजे आधीं गोविंदरावांकडे जाऊन त्यांना डिक्शनरी दाखवायची. पण उशीर होईल आणि काका रागावतील म्हणून तो सरळ घरीं गेला. कारण कुठेंही गेलें तरी दिवे-लागणीच्या आंत घरीं परतलें पाहिजे अशी काकांची कडक शिस्त होती. तो आंत येत असतांनाच किंचित् हेटाळणीच्या थंड स्वरांत काकांनीं विचारलें,

"काय, मिळाली का डिक्शनरी?"

"हो." असें म्हणून त्यांना दाखवण्यासाठीं माधवनें ती उत्सुकतेनें त्यांच्यापुढें केली. त्याबरोबर "बाबा, काय तें?" म्हणून त्यांच्या एका मुलानें त्यावर झडप घातली. त्यासरशीं ती त्यांच्या हातांतून धपदिशीं खालीं पडली. तोंच दुसऱ्या मुलानें ती ओढून घेतली आणि त्या दोघांनीं तिची ओढाताण चालवली.

दिवसभर पायपीट करून मोठ्या कष्टानें मिळवलेल्या त्या पुस्तकाची ती ओढाताण पाहून माधवला आंतडीं तोडल्या-मारखें झालें. ती त्यांच्या हातून काढून घ्यायची, तर त्यांना रडवूनही उपयोग नव्हता. नाहींतर त्यांनीं भोकाड पसरलें असतें आणि काकूचीं बोलणीं पुन्हा त्यालाच खावीं लागलीं असतीं. म्हणून हळूच समजुतीनें त्यांच्या हातून ती सोडवून घेण्याचा तो प्रयत्न करूं लागला.

तेवढ्यांत आंतून काकूचा खडा स्वर आला,

"संध्याकाळची आरती व्हायची आहे म्हटलं अजून. आठवण आहे ना? नाहींतर त्या पुस्तकाच्या कौतुकांत भान नाहीं राहायचं हो ऽ ऽ."

अलार्मसारखा तो आवाज कानांत घणघणतांच माधवनें ती डिक्शनरी कशीतरी पुस्तकांच्या कोनाड्यांत दडपली आणि सगळ्या दिवसभराच्या श्रमानें अंग आंबल्यासारखें

झालें होतें तरी तो हातपाय धुऊन मुकटा नेसून आरतीच्या तयारीला लागला.

जेवणाच्या वेळींसुद्धा काकूंनीं किंवा काकांनीं, "तूं कुठें कांहीं खाल्लंस का? काय खाल्लंस?" हें विचारलें नाहीं. नेहमींप्रमाणेंच दुपारची शिळी भाकरी त्याच्या पानांत पडली. ती चावतांना त्याचें तोंड दुखत होतें. अंगांत सगळीकडून कळा निघत होत्या. पण त्यानें डिक्शनरी मिळवली होती. त्या आनंदापुढें त्याला सगळीं दुःखें कःपदार्थ होतीं.

एक प्रकारच्या आनंदाच्या धुन्दींतच तो जेवून बाहेरच्या बैठकीच्या खोलींत आला. पण तेथें आल्याबरोबर त्याला तिसऱ्या मजल्यावरून खालीं फेकून दिल्यासारखें वाटलें. डिक्शनरीचीं कितीतरी पानें बैठकीवर चौफेर विखुरलीं होतीं. आणि त्यांतलीं बरीचशीं ओढाताणीनें चुरगळून गेलीं होतीं.

तो स्तिमित होऊन क्षणभर तें दृश्य पाहातच राहिला. ज्यांची ती डिक्शनरी होती त्यांना ती अजून त्यानें दाखवली नव्हती. आणि आतां तर ती दाखवणार कशी? आणि कोणत्या तोंडानें? एखादें अतिशय मोलाचें असें काचेचें भांडें पावलागणीक सांभाळून जपून आणावें आणि मुक्कामावर पोचतें, तों कोणींतरी लाथेनें त्याच्या ठिकऱ्या उडवाव्या, तसेंच झालें होते हें!

मोठ्या कष्टानें त्याने तीं सगळीं पाने गोळा केलीं आणि कशीतरी जुळवलीं. तीं परत नीट चिकटवायला त्याला तीन दिवस लागले. तरीही तीं पहिल्यासारखीं चिकटलीं नाहींतच. नीट न सांधलेल्या फ्रॅक्चरसारखा त्यांत एक प्रकारचा ओबड-धोबडपणा राहिलाच.

* * *

वर्गांत जेव्हां मोने मास्तरांनीं पुन्हा डिक्शनरीसंबंधीं विचारलें, तेव्हां पांच-सातच मुलांनीं डिक्शनरी आणल्याचें दिसून आलें. पण त्यांत माधव होता. ज्याच्याजवळ साध्या

वह्या घ्यायलासुद्धा पैसे नसत, त्यानें डिक्शनरी आणलेली पाहून सर्वांना मोठें नवल वाटलें. पण डिक्शनरी मिळवल्याचा त्याला जो कांहीं आनंद वाटला असेल, त्यांत दुःखाची एक गडद छटा मिसळलेली होती, ह्याची त्यांना काय कल्पना ?

* * *

आज ह्या गोष्टीला पंचवीस तरी वर्षें होऊन गेलीं आहेत. मॅट्रिकपर्यंतचाच नव्हे, तर त्यानंतरचाही अभ्यास माधवनें त्याच पट्ट्या चिकटवलेल्या डिक्शनरीच्या साहाय्यानें केला. आतां तो मोठा अंमलदार झाला आहे. त्यानें आपला स्वतःचा असा निवडक ग्रंथांचा संग्रह केला आहे. त्यांत अनेक नवीन उत्तम कोश आणि संदर्भग्रंथ आहेत. पण अजूनही त्याला आपल्या त्या जुन्या, फ्रॅक्चर नीट न सांधलेल्या डिक्शनरी-बद्दल एक वेगळाच जिव्हाळा वाटतो. अजूनही जेव्हां जेव्हां त्या डिक्शनरीकडे त्याची दृष्टि जाते, तेव्हां तेव्हां त्या कष्टाच्या वाटचालीची, देशमूख मास्तरांची आणि त्या प्रेमळ, पोक्त बाईची आठवण येऊन त्याच्या हृदयांत एक विचित्रशी कालवाकालव होते.